चार अंकी

स्वतंत्र सामाजिक नाटक

# जुगार

लेखिका :

सौ० मुक्ताबाई दीक्षित, एम्. ए., बी. टी.



दि इंटरनॅशनल बुक सर्व्हिस
डेक्कन जिमखाना पुणें – ४.

अभिजात नाट्यप्रेमी

श्रीधर विनायक ऊर्फ बाळासाहेब वर्तक

यांच्या

स्नेहमय स्मृतीस

## ‘जुगार’ नाटकाच्या प्रयोगावरील अनेक विद्वान् रसिकांच्या व वृत्तपत्रांच्या अभिप्रायांतील कांहीं निवडक वेंचे

*Professor R. K. Lagu*, M.A.

"...... It was an A-1 show. I enjoyed it from start to finish....It is a social and psychological play—a play with a purpose if not a problem play.

The purpose of the play does not interfere with our enjoyment of the play. The characters are living human beings as we know them from day to day. They are not puppets dancing to a tune. The plot is a pretty piece of invention and the situations thoroughly natural. The dialogue is lively throughout and illustrates the characters of the speakers. Not a word is wasted.

Love is represented as a flimsy, fleeting feeling. Marriage is a plunge in the dark. You do not know which way the cat will jump. It is a gamble. A woman's instinct for motherhood is the life and soul of her being. It is this which penetrates, informs and moulds her thoughts and feelings. It is a refined, purified and humanized version of Shaw's life-force. It was worth while writing a play round this notion......".

**कै. श्री. वि. वर्तक** ( " अंधळ्याच्या शाळे "चे कर्ते )

"...नव्या नाटककाराला जें भाग्य क्वचित्च लाभतें तें मुक्ताबाईंना लाभलें. नाटकास नाट्यर्षी श्री. अण्णासाहेब कारखानीस, प्रो. रा. कृ. लागू इत्यादि थोर मंडळींचा आशीर्वाद मिळाला. नटवर्य केशवराव दाते यांनीं नाटकाचें दिग्दर्शन केलें-नाटकाच्या यशाला याहून जास्त काय पाहिजे? नाटकाचें कथानक सुसूत्र असून त्यांत राग, लोभ, द्वेष, सूड इत्यादि विकारांना लेखिकेनें

भरपूर वाव दिला असून विवाह प्रश्नांची छाननी केली आहे. मधूनच "बेबी "च्या कायदेबाज वृत्तीमुळें हास्यविनोदालाही भरपूर वाव मिळाला असून नाटकाला रंग चढून प्रेक्षक सर्वतोपरी तृप्त होतात. शेवटीं 'इंदिराबाई' मानव्याच्या–मातृहृदयाच्या जोरावर सूडाच्या भावनांचें परिमार्जन करतात व नाटक संपतें...."

**आचार्य प्र. के. अत्रे** ( नवयुग )

"...अलिकडे चांगलें नवीन नाटक मराठी भाषेंत पाहण्याचा योग क्वचित्‌च येतो. सौ. मुक्ताबाई दीक्षित या सुशिक्षित सुसंस्कृत आणि विचारवंत लेखिका आहेत. लघुकथाकार म्हणून मराठी साहित्यांत त्यांचें नांव मोठें आहे. त्यांनीं एक उत्तम आणि विचारप्रवर्तक नाटक लिहिल्याबद्दल आम्ही मुक्ताबाईंचें तेथल्या तेथें अभिनंदन केलें. मुक्ताबाईंची भाषा प्रौढ असूनही सोपी आणि प्रासादिक आहे आणि संवादाचा रोख तात्त्विक चर्चेकडे असूनही ते परिणामकारक आहेत. एकंदरींत सौ. मुक्ताबाईंच्या या नवीन 'जुगार' नाटकानें मराठी नाट्य-वाङ्मयांत एक सरस भर टाकली आहे एवढेंच नव्हे तर मराठी रंगभूमीचें आकर्षण वाढविलें आहे...."

**प्रो. श्री. म. माटे** ( प्रभात–स्फुटविचार )

"...सौ. मुक्ताबाई यांनीं "सुरस कथा" लिहिणाऱ्या लेखिका हा लौकिक मागेंच मिळविला होता आणि मुंबई युनिव्हर्सिटीनेंही "तर्खडकर पारितोषिक" देऊन त्यांचा गौरवही केला होता. त्यांचें हें फार सुंदर 'जुगार' नाटक पाहिलें. नाटकाची भाषा गोड आणि समर्पक आहे. लिखाण उच्च प्रतीचें आणि त्याचा प्रयोग बहारीचा झाला...."

**प्रो. श्री. के. क्षीरसागर** :—( सुखसंवाद–"विचाराची लोकसत्ता )

"...पहिल्या प्रयोगाला पुण्याच्या सुशिक्षित समाजाचा अर्कच (Cream) हजर होता. त्या विद्वान् प्रेक्षक-वर्गाच्या अपेक्षा या नव्या नाटकानें कल्पनेबाहेर पुऱ्या केल्या. नव्यानेंच रंगभूमीवर येत असलेल्या एकाद्या नाटकानें पहिल्या रात्रीं एवढी पकड घेतल्याचें माझ्या तरी स्मरणांत नाहीं...."

# निवेदन

नाटक व ‘ लोकाग्रह ’ यांचा फार जवळचा संबंध असावा! पूर्वीच्या नाटकमंडळ्या खास लोकाग्रहास्तव कंपनीचे एखाद्या गांवचे मुक्काम वाढवीत. आचार्य अत्र्यांसारख्या ‘उंच’ दर्जाच्या साहित्यिकांनींहि आपणाला कोणीतरी नाटककार बनविल्याचें सांगितलें आहे. मग माझ्यासारख्या, रंगभूमीचा फक्त ‘ प्रेक्षक ’ या नात्यानेंच संबंध असलेल्या ‘बाई-माणसाला’ मनांत इच्छा असूनसुद्धां प्रत्यक्ष नाट्यलेखनाला प्रवृत्त होण्यापूर्वी, कोणाच्या तरी आग्रहाची, उत्तेजनाची, जरूर वाटल्यास आश्चर्य नाहीं. तो आग्रह मला महाराष्ट्राचे नाट्य-महर्षि श्री. अण्णासाहेब कारखानीस यांनीं केला–अर्थात् त्यांच्या मितभाषी स्वभावानुरूपच–आणि श्री. केशवराव भोळे यांनीं त्याला हातभार लावला. चारआठ दिवसांनीं अण्णांचा ‘ कुठवर आलं ?’ अशी चौकशी करण्याचा धाक नसता तर माझें लेखन नाट्याइतका पल्ला गांठूं शकलें नसतें. त्याचप्रमाणें सुप्रसिद्ध कर्नाटक-कवि प्रा. द. रा. बेंद्रे यांचें उत्तेजन नसतें तर मला इतका धीरहि वाटला नसता.

अर्थात् विषयाची निवड, कथानक, यांची जबाबदारी माझ्यावरच. कथानक १९४६ सालांतील सवतबंदीचा कायदा महिना पंधरा दिवसांवर आला असतांनाचें आहे. आज तो कायदा मुंबई प्रांतापुरता पास होऊनहि तीन वर्षें झालीं. या दृष्टीनें तो विषय–सपत्नीकाचें लग्न–हा या नाटकाचा विषय आहे असें मानल्यास, तो जुना, शिळा, अतएव नाटकास अपात्र असाहि कांहीं मंडळींना वाटूं शकेल. माझी, त्या घटनेकडे पहाण्याची भूमिकाच वेगळी आहे. तो प्रश्न सोडवण्याकरतां सरकारला कायदा करावा लागला; मानवतेच्या भूमिकेवरून तो प्रश्न सुटला नाहीं. ह्यावरून तो प्रश्न लेखनविषय करण्याची शक्यता मला वाटते. तरीहि मी त्या कथानकाची निवड करतांना तें एक ताजें, अद्यावत् आकर्षण असलेलें कथानक आहे अशी कल्पना केलीच नव्हती, तर मला जो एक विषय अंतिम महत्त्वाचा म्हणून आवडला, त्या विषयाचें सामाजिक व्यवहारांतलें एक उदाहरण म्हणून तें कथानक मीं निवडलें.

तो विषय म्हणजे ‘ एकाच्या दुःखांतून दुसऱ्याच्या सुखनिर्मितीची अशक्यता ’ हा होय. ओघानेंच सुखनिर्मितीचे विविध मार्ग कोणते हा प्रश्न आला व त्याचें एक उत्तर मला ‘ विवाह ’ या शब्दांत सांपडलें. मनुष्याच्या सुखनिर्मितीच्या विविध मार्गांत विवाह हा अत्यंत महत्त्वाचा, त्याच्या भावजीवनाशीं सर्वस्वीं एकरूप झालेला असा मार्ग आहे म्हणून आणि विवाहाच्या एका प्रकाराचें कथानक घेतल्यामुळें ‘ विवाह ’ हाच या नाटकांतला महत्त्वाचा विषय आपोआप ठरला. पण विवाह हा तरी मनुष्याचा हमखास सुखाचा मार्ग आहे का ? नाहीं. रूढ मार्गानें केलेला विवाह नसेल तर प्रीतिविवाह तरी ? त्याहून नाहीं. ‘ अतिप्रीतिविवाह ’ ( सपत्नीकाचा प्रेमाखातर होणारा विवाह ) ? सुतराम् नाहीं. कारण त्या सुखाचा पायाच दुसऱ्याची दुःखनिर्मिति हा आहे. मनाच्या सुसंस्कृततेची पातळी जितकी उंच तितका अशा लग्नांत सुखाचा संभव कमी. दुःखशोक हीं जगांत सर्वांच्याच मार्गे लागलीं आहेत; पण आपण एक शापित व्यक्ति आहोंत, कोणाचे तरी तळतळाट आपल्याला भोवताहेत, या कल्पनेच्या भुतापासून कोणाचीच, निदान हिंदु मनाची सुटका होणें कठीण. प्रस्तुत नाटकांतील स्वतः निरपराध असलेल्या इंदिराबाईंचीहि या कल्पनेपासून सुटका होत नाहीं. पण इंदिराबाई आपल्या विवाहाचें वैफल्य बोलून तरी दाखवूं शकतात; प्रेमाखातर केलेल्या विवाहांत तींहि चोरी !

मग विवाहसौख्याचा हमखास मार्ग तरी कोणता ? असा मार्ग अस्तित्वांत असल्याचा निदान आज तरी कोणाला भरंवसा वाटतांना दिसत नाहीं. विवाह निश्चितपणें सुखी करण्याची वल्ली निदान अजून तरी कोणाला गवसलेली नाहीं. भविष्यकाळांत उभे असतात तोंपर्यंत सर्वच विवाह सुखाचे भासतात. कोरेपणांत सर्वच वस्त्रांचे विविध रंग सुंदर दिसतात; पाण्यांत घातल्यावर विटतात, कळाहीन होतात. त्या दिव्यांतून टिकूं शकणारें वस्त्र सांपडणें जितकें कठीण, तितकेंच लग्नाच्या दिव्यांतून वांचणारें प्रेम, अतएव सौख्यपूर्ण वैवाहिक जीवन. रूढिमार्गानें विवाह सुखमय होत नाहीं असें पाहून आम्ही प्रीतिविवाहाचा जणुं काय तोडगा शोधून काढला. पण त्यानेंहि दगा दिला ! या सर्वांचा परिणाम आमच्या लग्नसंस्थेबद्दलच्या आदरावर झाला आहे.

आम्हांला विवाह ही प्रेमभावनेचा अंत पाहणारी एक निर्दय घटना वाटूं लागली आहे. ( भर्तृहरीच्या तरल भावनेला 'सात शल्यें' बोचलीं तसें विवाहसुखाचे मावळत जाणारे रंग कां बोचले नाहींत कोण जाणे ! ) त्या घटनेंतून तावून सुलाखून प्रेम वांचू शकलें, तर त्या सुखाला सीमा नाहीं. तरी पण तोहि 'जुगार'च, फक्त जिंकलेला. अर्थात् त्याचेंहि कर्तृत्व जुगाऱ्याकडे नाहीं.

यावर तोडगा शोधण्याचे कायदेपंडितांचे प्रयत्न सफळ होतांना दिसत नाहींत. समाजशास्त्र्यांचेहि सफळ होतांना दिसत नाहींत. उलट विवाह-विषयक चळवळींचें, प्रयोगांचें आणि सुखी विवाहांचें प्रमाण इतकें व्यस्त दिसतें कीं हताश होऊन आम्ही त्या घटनेला 'जुगार' म्हणतों !

ही स्थिति स्पृहणीय खास नाहीं. स्त्रीपुरुषांचें साहचर्य हा जर विश्वाच्या योजनेंतला महत्त्वाचा घटक असेल, तर त्या योजनेंत सुखमय साहचर्याचे मार्गहि अस्तित्वांत असले पाहिजेत. आम्हांला ते सांपडत नाहींत. सुखमय वैवाहिक जीवन या कल्पनेवरचा इंदिराबाईचा विश्वासच उडाला आहे. ( बाबासाहेबांच्या सहवासांत तसा न उडाला तरच नवल ! ) त्यांचा स्वतःचा अनुभव तोच; त्यांच्या अक्काचा तोच; त्यांच्या सवतीचा तोच. त्यांच्या सुप्त मनाला बेबीच्या विवाहसौख्याचीसुद्धां धास्ती वाटत असली पाहिजे. एका प्रेमळ मातेचा सुखमय साहचर्यावरचा भरंवसा अजिबात उडावा, ही खरोखर अत्यंत दुःखदायक घटना आहे.

पण उषेचें लग्न ? तिच्या बाबतींत मात्र इंदिराबाईंना सुखाचा संभवच दिसत नाहीं. एकाच क्षणाला एकीच्या सुखाचा जन्म व दुसरीच्या सुखाचा मृत्यु ! या दोनहि गोष्टी ज्या एका घटनेमुळें प्रकर्षानें प्रत्ययाला येतात अशी घटना म्हणजे सपत्नीकाचें लग्न ( अर्थात् अपवाद जमेला धरून ) आणि म्हणून माझ्या विषयाचें विशदीकरण करणारें माझें सपत्नीविवाहाचें कथानक असा हा ह्या नाटकाचा विषय व नाटकाचें कथानक, यांचा अन्योन्यसंबंध निदान माझ्या दृष्टीनें आहे.

यावर दुसरा प्रश्न असा निघतो कीं मग उषा ही बाबासाहेबांचीच मुलगी कां ? सपत्नीकाच्या विवाहाच्या कथानकाला ह्या घटनेची जरूर आहे काय ?

याचें उत्तर असें आहे कीं, विषयाच्या दृष्टीनें नाहीं; पण नाट्याच्या दृष्टीनें आहे. उषा तिऱ्हाइताची मुलगी असती, तर तिसऱ्या अंकांतला नाट्यपूर्ण प्रसंग निर्माण झाला नसता, बाबासाहेबांच्या स्वभावचित्रणाला पार्श्वभूमि मिळाली नसती. उषा ही बाबासाहेबांची मुलगी असल्याचें कळल्यामुळें जर लग्न मोडलें असतें, तर माझ्या ' मूळ विषयाला ' धोका पोंचला असता. पण तिचें लग्न ज्या अर्थी दुसऱ्याच कारणानें–इंदिराबाईच्या जीवनकथेवरून जीवितांतलें एक सत्य कळून–मोडतें, त्या अर्थी ती अक्काची बहीण असण्यास प्रत्यवाय नाहीं. उषा ही सावत्र मुलगी नसती, तरी इंदिराबाईच्या जीवनांतले सुखदुःखानुभव तेच राहिले असते. उषा वसंताशीं लग्न न करतां नुसतीच त्याची सहचरी म्हणून राहिली असती, तरीहि तेच अनुभव राहिले असते. उषा मेव्हण्याशीं लग्नाला तयार झाली म्हणून लग्न हा ' जुगार ' झाला असाहि भाग नाहीं. उलट ह्या लग्नांतून–प्रेम जमेला धरूनसुद्धां–दुःखनिर्मितीचाच संभव आहे अशी इंदिराबाईची जीवनकथा ऐकून तिची खात्री पटली. वैवाहिक जीवनाचा अनुभव घेतलेल्या इंदिराबाई "प्रचीतीचें बोलणें" बोलल्या. त्या बोलांनीं उषेच्या सद्भावनांचा ठाव पाहिला, तिच्या निश्चयाला सुरुंग लावला.

अर्थात् हीं सर्व सुखदुःखें भावनांचीं, सुसंस्कृतांचीं आहेत; भाकरीचीं नव्हेत, याचीहि मला जाणीव आहे. पण त्याबरोबरच सुसंस्कृतांचीं भावनात्मक सुखदुःखें ही एक उपेक्षणीय गोष्ट आहे असेंहि मला वाटत नाहीं. जीवनाचा ठाव पहाणारीं कोणत्याहि प्रकारचीं सुखदुःखे विचारविषय व्हावीत. माझ्या स्वतःच्या बाबतीत मी असे म्हणेन कीं ज्या वर्गात मी जन्मले, वाढलें, नित्य वावरतें, ज्या वर्गाच्या सुखदुःखांशीं मी समरस होऊं शकतें, त्याच वर्गाचें चित्रण करण्याचा मला जास्त अधिकार पोचतो. आणि त्यांतल्या त्यांत आमच्या स्त्रियांचीं सुखदुःखें तरी एकाच काय पण अनेक नाटकांचा विषय होण्याइतकीं भरपूर खास आहेत अशी माझी खात्री आहे.

इतक्या विवेचनानंतर एक गोष्ट सहज लक्षांत येण्यासारखी आहे कीं, हें नाटक एखादी सामाजिक समस्या पुढें टाकण्यासाठीं अगर सोडवण्यासाठीं मीं लिहिलेलें नाहीं. केवळ अनुरंजनाकरतांहि नाहीं; तर जीवनाचा गंभीर विचार करण्यासाठीं लिहिलें आहे. त्यानें ' रंजन ' करावें, याकरतां मीं माझ्या

शक्त्यनुसार खटपटहि केली आहे. कारण हें 'नाटक' आहे याची मला जाणीव आहे. त्या रंजकतेंत अगर विचारसरणींत दोष असेल, तर त्याला कारण माझ्या बुद्धीच्या वा माझ्या कलेच्या मर्यादा. याव्यतिरिक्त दुसरें नाहीं.

हें इतक्या स्पष्टपणें कबूल करण्याचा प्रसंग माझ्यावर या नाट्यप्रयोगांतल्या माझ्या सर्व सहकाऱ्यांनीं–यांत जीवनांतला सहकारीहि सामील आहे–आणला आहे. नाटक हें प्रयोगक्षम असलें पाहिजे, प्रयोगक्षमतेची परीक्षा प्रयोगावांचून ठरत नाहीं, हें माहीत असतांना 'आपण नाटक लिहिलें पण–' ही मूळ समस्याच ह्या लोकांनीं माझ्यापुढें उभी राहूं दिली नाहीं. मग दिग्दर्शित कोण करणार? निर्माण कोण करणार? कामें कोण करणार? या संकीर्ण समस्यांची गोष्टच दूर. माझ्यापुढें कोणतीच सबब उरूं द्यायची नाहीं, असा या मंडळींनीं जणुं काय चंग बांधला होता! सध्यांच्या धनहीनतेच्या काळांत नाट्यप्रयोग ही किती अवघड गोष्ट आहे, याची कल्पना त्या सृष्टीशीं परिचय असणारांना तरी करून देण्याची गरज नाहीं. आजच्या जमान्यांत चालू असलेले नाट्यप्रयोग दोन प्रकारचे असतात: एक धंदेवाईक कंपन्यांचे नाट्यप्रयोग व दुसरे हौशी नाट्य-संघांचे प्रयोग. धंदेवाइकावर नाटकावरच जगण्याची जबाबदारी असल्यामुळें नाटकांच्या बाबतींत त्यांना एका ठराविक सांच्यापलिकडे जाणें दुर्घट होतें, तर हौशी नाट्यसंघांची हौस 'नाटकांत काम करणें' इतकीच असल्यामुळें त्यांच्या हौसेला खरोखरच 'मोल' उरत नाहीं. या दोहोंच्या कचाट्यांतून वांचणारी प्रयोगनिर्मिति व्हावी कशी? हा प्रश्न वरील सर्व मंडळींनीं जणुं काय एक-दिलानें सोडवला आणि 'जुगार'च्या नव्हे तर प्रा. बेंद्रे यांच्या वाक्याप्रमाणें खरोखरीच्या 'जीवनाच्या' या नाटकांत माझ्याकडे 'लेखकाची' भूमिका सोंपविली. ती भूमिका माझ्याकडून कितपत वठली हा माझ्या दृष्टीनें महत्त्वाचा प्रश्न नसून ती वठविण्याचा प्रयत्न मीं किती आस्थेनें, तन्मयतेनें, प्रामाणिकपणानें आणि निरलसतेनें केला, हा आहे. कारण असा प्रयत्न ही प्रत्यक्ष सुखसाधना आहे असा माझा तरी अनुभव आहे.

"श्री. दाते यांच्यासारख्या तीक्ष्ण घ्राणेंद्रियाच्या नाट्यचालकाकरतां नाटक लिहिण्याचा प्रसंग शत्रूवरहि न येवो!" अशी ज्या श्री. वर्तकांनीं 'लपंडाव'च्या प्रस्तावनेंत प्रार्थना केली आहे, त्याच वर्तकांना, श्री. दाते यांनीं

हें नाटक दिग्दर्शित करण्याचें कबूल केल्याबद्दल परम संतोष वाटला. कारण नटवर्य दाते यांच्या सहकार्यानें नाटक लिहिण्यांत कोणत्या प्रकारचा आनंद आहे, याची त्यांना कल्पना होती. तो आनंद माझ्याहि वांट्याला भरपूर प्रमाणांत आला, हें मी माझें भाग्य समजतें. श्री. केशवराव दाते यांना आजवर मी एक अद्वितीय नटश्रेष्ठ समजत होतें; पण ते एक श्रेष्ठ दिग्दर्शकहि आहेत-नाटकाचेंच नव्हेत, लेखकाचेंहि-ही गोष्ट मला अनुभवानें कळली. श्री. दाते कांहीं कारणामुळें येऊं शकले नाहींत तर पाऊणशें वर्षांचे अण्णा तीन तीन तास तालमी घेत. त्यांनाहि अशक्य झालें, तर केशवराव भोळे. तात्पर्य काय? समस्या नाहीं. स्टेजमॅनेजरचें व व्यवस्थापकाचें काम माझे बालमित्र व 'शिवाजी लाउड स्पीकरचे' मालक लक्ष्मण रामकृष्ण ऊर्फ नाना भिडे यांनीं अक्षरशः घाम गाळून केलें! अर्थात् नानांनीं माझ्याकरतां कांहींहि करणें ही गोष्ट माझ्या सरावांतलीच आहे. पण नटवर्ग?

नटवर्गाच्या-अथवा नटीवर्गाच्या म्हटल्यास जास्त बरोबर-बाबतींत मात्र आम्हांला बरेच अनपेक्षित व अतिशय उद्बोधक असे अनुभव आले. सध्यां नाटकांत कामें करण्याची स्त्रियांची हौस खेडोपाड्यापर्यंत पोंचलेली दिसते. गांवागांवांच्या व पेठापेठांच्या क्लबांतून नाटकें होतात व त्यांत स्त्रिया हौसेनें कामें करतात. आमची अशी कल्पना कीं आपला हौशी नटसंघ आहे, दात्यांसारखे दिग्दर्शक आहेत, सुशिक्षित, आर्थिक लाभाची आशा न बाळगणारा कौटुंबिक संघ आहे; तेव्हां हौशी व सुविद्य स्त्रिया यांत अगत्यानें भाग घेतील; पण अनुभव मात्र अगदीं वेगळा आला. स्त्रियांचीं कामें स्त्रियांनीं करावीं हें तत्त्व आतां सर्वमान्य झालें आहे; पण 'आमच्या स्त्रीनें' काम करावें हा तपशील मात्र सर्वांनाच अमान्य आहे! पुष्कळजणींना इच्छा आहे, अभिनयकला आहे, वेळहि आहे; पण घरची परवानगी नाहीं! आम्हांला भेटलेले श्री. श्री. वि. वर्तक व श्री. अनंतराव लिमये हे अपवाद! पैकीं वर्तक तर या प्रथेचे पहिले प्रवर्तक. त्यांनीं सौ. वर्तकांना मुंबईहून पुण्यास पाठवलें! कर्नाटकगायक श्री. भीमसेन जोशी यांनीं एक अगदीं जुजबी भूमिका पत्करून केवळ 'नमना'च्या गाण्याकरतां अगर 'वंदमातरम्'करतां आपली बहुमोल गायनकला राबवली. आमच्या सर्वच नटवर्गानीं सर्वच बाबतींत आपल्या प्रयत्नांची शिकस्त केली. अनेक

अडचणींमुळें तालमी दीर्घ कालपर्यंत चालल्या, मधून मधून महिना महिना बंद राहिल्या, पात्रांची अदलाबदल झाली; पण नटवर्गानें कंटाळा केला नाहीं, चिकाटी सोडली नाहीं. 'घरचें खाऊन' त्या मंडळींनीं 'लष्करच्या भाकरी भाजल्या' नाहींत, तर नाट्यकलेची सेवा केली. नाटकांत काम करण्याच्या हौशीपेक्षांहि अभिनयकला शिकण्याकडे दृष्टि ठेवली. या सर्वांची नाट्यसेवा रंगदेवतेच्या चरणीं रुजू झाल्यावांचून खास रहाणार नाहीं.

या नाटकांत प्रत्यक्ष काम करणाऱ्यांइतकाच मला आदर वाटतो तो त्यांना कामाची परवानगी देणाऱ्या, त्याकरतां परोपरीनें अडचणी सोसणाऱ्या 'घरच्या मंडळी'बद्दल. नटवर्गाला काम शिकण्याचा आनंद तरी होता; पण श्री. लिमये, सौ. कालिंदी जोशी, सौ. सुमित्रा मराठे इत्यादींना तोहि नाहीं! त्यांनीं सहा महिने निरपेक्षपणें प्रयोगाच्या दिवसाकडे दृष्टि ठेवुन "घरीं येण्याची" वाट पाहिली! ह्या सर्वांच्या सौजन्याला सीमा नाहीं. श्री. वर्तक तर जणुं काय आपलेंच नाटक आहे इतक्या आस्थेनें सर्वच गोष्टी करीत. पुण्यास झालेल्या ६ प्रयोगांपैकीं ५ प्रयोगांना श्री. वर्तक हजर होते! व त्यांची उत्साहमूर्ति थिएटरमध्यें वावरतांना, सर्वांना उत्तेजन देतांना दिसायची. सकाळीं डेक्कन क्वीननें मुंबईस जाऊन ते वेळेवर ऑफिसला हजर होत! त्यांचें नाट्यप्रेम व स्नेहशीलता दोहोंलाहि मर्यादा माहीत नव्हती. आम्हा सर्वच मंडळींचें दुर्दैव कीं इतक्या अल्प काळांत आणि इतक्या अनपेक्षितपणें आम्ही त्या सौहार्दाला मुकलों.

यांशिवाय-आमच्या अनेक मित्र-सुहृदांनीं नाट्यप्रयोगाच्या ह्या 'नरहर देवाच्या पालखी'ला हात लावला आहे. श्री. वि. द. साठे, श्री. मधु पटवर्धन हे आम्हांला लागेल ती मदत व पडेल तें काम करायला तयार असलेले आमचे 'हरकामी ठेकेदार'. हें लिखाण करीत असतांनासुद्धां मला जरूर ती 'कुमक' साठे यांनीं द्रुतगतीनें पाठवली आहे. वर उल्लेखिलेल्या सर्वच मंडळींचा सुहृद्भाव पाठीराखा नसता तर नाटकाच्या प्रयोगाचा हा अजस्त्र रथ माझ्या दुबळ्या हातांनीं ओढणें अशक्य होतें.

ता. २६ जानेवारी १९५०
चारुसदन
पी. वाय्. सी. जिमखाना, पुणें ४

मुक्ताबाई दीक्षित

## ऋणनिर्देश

सदर नाट्यनिर्मितीच्या कामांत प्रत्यक्ष नटवर्ग अगर दिग्दर्शक, व्यवस्थापक यांच्याशिवाय अनेकांनीं अनेक परीनें मला मनःपूर्वक साहाय्य केलें आहे.

१९४८ च्या अखेर लिहून पुरें झालेलें हें नाटक आमच्या अनेक रसिक मित्रमंडळींना व नाट्य-व्यावसायिकांना वाचून दाखवण्याचा ३।४ महिने मीं इतका धडाका सुरू केला होता कीं त्याबद्दल एका मित्रांनीं "तुम्ही फार लोकांना वाचून दाखवतां बुवा !" अशी–अर्थात् नाटक ऐकून झाल्यावर–तक्रार-सुद्धां केली. पण रंगभूमीच्या अननुभवामुळें, आपल्याला न सुचलेल्या कितीतरी गोष्टी इतरांच्या लक्षांत येतात असें लक्षांत आल्यावरून तें वाचन मीं थांबवलें नाहीं.

१९४९ च्या मार्च–एप्रिलमध्यें श्री. मो. ग. रांगणेकर, भोळेदंपती, इत्यादींपासून सुरवात करून जुलै-ऑगस्टपर्यंत मीं अनेकांना नाटक वाचून दाखविलें. विद्वद्रत्न प्रो. रा. कृ. लागू, श्री. के. नारायण काळे, श्री. दि. के. बेडेकर, श्री. पु. ल. देशपांडे, श्री. मो. ग. रांगणेकर, सौ. ज्योत्स्नाबाई व श्री. केशवराव भोळे, माझे बंधु, श्री. ना. वि. करंदीकर, श्रीमति डॉ. कमलाबाई देशपांडे,

श्री. बाळासाहेब सहस्रबुद्धे, डॉ. रा. वि. रहातेकर, इत्यादींच्या सूचनांचा या नाटकाचें मूल्य वाढविण्याच्या कामीं मला अतिशय उपयोग झाला आहे. त्याशिवाय सौ. इंदिराबाई देवधर, सौ. आनदीबाई शिर्के, श्री. भय्यासाहेब उमराणी, श्री. ना. ग. गोरे, प्रो. व सौ. पोंक्षे व श्री. प्र. श्री. कोल्हटकर या सर्वांबरोबर केलेल्या चर्चेचाहि मला उपयोग झाला आहे.

नाटकाच्या प्रयोगाच्या बाबतींत ‘ सिंहाचा वांटा ’ श्री. मो. ग. रांगणेकर यांचा आहे. त्यांनीं आपल्या नाट्यनिकेतनचीं सेटिंग्ज, रंगसाहित्य, इत्यादि सर्वच गोष्टी जरूर त्या मनुष्यबळासकट आमच्या स्वाधीन केल्या. नाटकाच्या तालमी-करतां वनिताविश्रामचा मोठा हॉल संस्थेच्या अध्यक्ष सौ. राधाबाई रानडे यांनीं आम्हांला भाड्यानें देऊन एक मोठीच गैरसोय दूर केली.

मुंबईस झालेल्या तीन प्रयोगांच्या यशाचें सर्व श्रेय महाराष्ट्ररंगभूमीसाठीं तन–मन–धन सदैव अर्पण करण्यास तयार असलेले डॉ. भालेराव, मराठी साहित्यसंघ व डॉ. गं. म. व सौ. मनोरमा फडके यांचें आहे.

वरील सर्वच मंडळींची मदत नसती तर ‘ जुगार ’चे प्रयोग झाले त्या स्वरूपांत होऊं शकले नसते. सर्वांचे मी मनःपूर्वक आभार मानतें.

यांशिवाय माझ्या आणखी एका मित्रसंघाचे आभार मानणें माझें कर्तव्य आहे. नाटकाच्या तालमींची दगदग कांहीं दिवस केल्यानंतर अनेक वेगवेगळ्या कारणांनीं ज्यांना प्रत्यक्ष प्रयोगांत काम करणें अशक्य झालें, त्यांनींहि या नाटकावरचा आपला लोभ कायम ठेवला आहे. या मंडळींना त्यांच्या सौजन्याबद्दल धन्यवाद.

यांतील छायाचित्रें व मुखपृष्ठाच्या मूळ कल्पनेपासून रचनेपर्यंतची योजना ही सर्व पुणें येथील छायाचित्र–सुविख्यात कलावंत श्री. वा. ना. भट यांची कलाकृति असून तीवर श्री. भट यांनीं त्यांच्यांतील ‘अभिजात कलावंत’ संतुष्ट होईपर्यंत मेहेनत घेतली आहे हें वेगळें सांगण्याची गरज नाहीं. पुस्तकाची मुद्रणसजावट व नुसतीं मुद्रितेंच नव्हे तर वाङ्मयदृष्ट्या व नाट्यदृष्ट्या अधून मधून वाक्येंहि कसोशीनें तपासण्याचें काम श्री. डी. आर. ऊर्फ बाबा तेंडुलकर यांनीं अत्यंत आस्थेनें केलें आहे. मुद्रणसौंदर्याचें श्रेय श्री. सरदेसाई यांजकडे आहे.

मुक्ताबाई दीक्षित

भूमिका प्रवेशानुक्रमें

| | | | |
|---|---|---|---|
| **इंदिराबाई** | ... | ... | बाबासाहेबांच्या द्वितीय पत्नी. |
| **जाई** | ... | ... | मोलकरीण. |
| **बेबी** | ... | ... | इंदिराबाईंची धाकटी मुलगी. |
| **श्रीकांत** | ... | ... | बाबासाहेबांचा पुतण्या. |
| **बाबासाहेब** | ... | ... | एक बडे ऑफिसर. |
| **डॉ. वसंतराव** | ... | ... | बाबासाहेबांचे जामात. |
| **चैतन्यदेव** | ... | ... | उषेला प्रवासांत भेटलेला एक वृद्ध स्नेही. |
| **उषा** | ... | ... | ब्रह्मदेशाहून परत आलेली एक निर्वासित कुमारिका. |

कथानकाचा काल

सन १९४६ जून – जुलैचा सुमार

नाटकाच्या चार अंकांतील घटना एकेक दिवसाच्या अंतरानें घडतात.

स्थळ

**पुण्या-मुंबईसारखें कोठलेंहि शहर**

| | | | |
|---|---|---|---|
| **अंक पहिला** | ... | ... | बाबासाहेब जोशी यांचा दिवाणखाना. |
| **अंक दुसरा** | ... | ... | डॉ. वसंतराव यांचा दिवाणखाना. |
| **अंक तिसरा** | ... | ... | } उषेची खोली. |
| **अंक चौथा** | ... | ... | |

**भूमिकांचीं नांवें संपूर्णपणें काल्पनिक आहेत.**

या नाटकाचा पहिला प्रयोग ता. १५ ऑगस्ट १९५० रोजीं रात्रीं ९ वाजतां जीवनकला मंडळ, पुणें या संस्थेनें भानुविलास नाटकगृहांत केला. त्या वेळीं त्यांत भाग घेतलेल्या कलाकारांचीं नांवें:—

: दिग्दर्शक :

नटवर्य केशवराव दाते

: कलाकार :

| | | |
|---|---|---|
| सौ पद्मावती वर्तक | ... ... ... | इंदिराबाई. |
| कु. सिंधुताई गोखले, बी.ए., बी.टी. | ... ... | जाई. |
| कु. प्रभा गुप्ते | ... ... ... | बेबी. |
| सौ. सुलोचना लिमये, बी. ए. | ... ... | उषा. |
| श्री. ना. ग. ऊर्फ बाळासाहेब जोशी | ... | श्रीकांत. |
| श्री. गोपाळराव ग. मराठे. | ... ... | डॉ. वसंतराव. |
| श्री. काकाजी जोगळेकर. | ... ... | बाबासाहेब. |
| श्री. भीमसेन जोशी (सुविख्यात कर्नाटक-गायक) | | चैतन्यदेव. |

: पद्य-लेखक :

कर्नाटक-कवि—प्रा. दत्तोपंत बेंद्रे, एम्. ए.

व

कु. यशवंती गुप्ते, बी. ए., बी. टी.

: संगीत :

कर्नाटक-गायक—श्री. भीमसेन जोशी

: कला :

श्री. ज. द. गोंधळेकर

: प्रॉम्प्टर :

श्री. काळे

: रंगभूमि-व्यवस्थापक :

श्री. ल. रा. ऊर्फ नाना भिडे

: निर्माते :

श्री. वि. ना. दीक्षित

## प्रार्थना

( कर्नाटक कवि—प्रो. द. रा. बेंद्रे )

प्राण सारे शरण आले
सकल कार्या-कारणा
मनन करितां तनन करिते
तनुहि वीणा पावना १

सुखमिषें दुःखी विषें
होइ प्राणा पूरणा
पंचकरणी पल्लवांना
हृदय बनवी तोरणा २

चरण तव संतरण-नौका
जगद्भावित भावना
हास्य किरणा त्वदनुसरणा
वाट न दिसे त्याविना ३

हरुषें हसूं, शोकीं असूं
जीव धर्मा धारणा
जननसुरसा, मरण विरसा
समरसा म्हणुं जीवना ४



## जुगार

# अंक पहिला

**वेळः**—संध्याकाळचा सुमार.

**स्थळः**—बाबासाहेबांचा दिवाणखाना. कोणत्याहि सुशिक्षित मध्यमवर्गीय कुटुंबाच्या दिवाणखान्याप्रमाणें. डाव्या बाजूला जिन्याच्या दोन तीन पायऱ्या दिसतात. पडदा उघडतांच आंतून जात्याची घरघर ऐकू येते आणि इंदिराबाई डाव्या बाजूच्या जिन्यानें उतरतांना दिसतात. इंदिराबाई वयानें सुमारें चाळीस ते पंचेचाळीसच्या दरम्यान. दिसायला गंभीर, सरळ भांग, सैलसर अंबाडा, दक्षिणी लुगडें असा त्यांचा वेष आहे. मुद्रेवरून त्या थोड्याशा चिंताग्रस्त दिसतात. पायऱ्या पुरत्या उतरतांच त्या मागें वळून वर पहातात आणि माडीवर असलेल्या अक्काला उद्देशून म्हणतात, "कशाला आतां खालीं येतेस, अक्का? जरा वेळ स्वस्थ पड." त्या मान फिरवतात तोंच त्यांना अक्काची पर्स व छत्री दोन वेगवेगळ्या खुर्च्यांवर कशातरी टाकलेल्या दिसतात. इंदिराबाई त्या वस्तूंकडे खिन्नपणें पहातात. वस्तू टाकण्याच्या त्या पद्धती-वरून त्यांना अक्काच्या व्यग्र मनःस्थितीची पूर्ण कल्पना येते. जडपणें इंदिराबाई त्या वस्तू उचलतात, व्यवस्थित ठेवतात. कोचावर बसून एक स्वेटर विणायला सुरुवात करतात. तोंच त्यांना आंतून जाईच्या जात्यावरील ओव्या ऐकू येतात.

जाई :

नग मज सर्गसुख सुख लोळं माझ्या दारीं
मज जावो जन्मवेरी माझी कुंकवाची चिरी
सात जन्म पुण्य केलं मनाजोगा भरतार
मायबापा तुम्हीं दिला तान्हुलीला रत्नहार
भोळा ग माझा सांब भोळया भावानं जिंकीन
काय सांगूं तुला सये दोन कुडी एक प्राण
सासुबाई तुझ्या कुशीं माझा राम एक बाणी
सीता माय लाडकीला जपतो ग मोत्यावाणी

(दर ओवीगणीक इंदिराबाई अस्वस्थ होत जातात. अखेर...)

इंदिरा: जाई, ए जाई....

जाई : जी ऽ ऽ (हातावरचें व लुगड्यावरचें पीठ झटकीत झटकीत बाहेर येऊन) जी—बाय....

इंदिरा: जाई, कशाला घरांत दळीत बसली आहेस? अन् तेंहि दुपारच्या वेळीं! गिरण्या नाहींत का?

जाई : पर म्यां पीठ दळीतच नाय! भाजणी—परवांच नव्हं का तुमी भाजणी काढाया सांगितली?

इंदिरा: म्हणून का तूं दळत बसली आहेस भाजणी?

जाई : गिरणीची भाजणी समदी विसविशीत. पीठ बी मिसळत्यात् जणुं! घरीं दळलिया भाजणी-कशी रवाळ, खरपूस लागतीया.

इंदिरा: अग, पण ही वेळ का दळायची? आत्तांच कुठं अक्का आली. जरा पडली तर तुझं जातं सुरू झालं!

जाई : (आनंदानें), आकाबाय आल्यात्? अन् आज कशा? न्हेमीं तर सनिवारीं येत्यात्-आल्या म्हणताव अन्ऽमग हैती कुठं?

**इंदिरा :** वर माडीवर, माझ्या खोलींत.

**जाई :** वर माडीवर पगती म्यां.

**इंदिरा :** उन्हांतून आली; म्हटलं पड जरा माझ्या खोलींत.

**जाई :** मायघरच्या इसाव्याला लेकरूं निघालं कीं त्याला ऊन बी लागत नाय् अन् पाऊस बी लागत नाय्. माझी मायबाय म्हनं....

**माहेराला जातां फुलागत व्हती काटे**
**ऊन कीं पाऊस माऊलीचं हंमूं वाटे**

(जाई वर जाते. इंदिराबाई उठून खिडकींतून बाहेर पाहतात व परत येऊन विर्णीत बसतात. त्या कोणाची तरी आतुरतेनें वाट पहातात. इतक्यांत जाई जिना उतरून खालीं येते.)

**जाई :** रुसल्याती जणुं !

**घडि घडि रुसतील राघु मैना अवखळ**
**जशि वळवाची सर घडीमध्यें ओसरेल**

( घरांत जायला निघते. )

**इंदिरा :** झोंप लागली आहे का ग अक्काला ?

**जाई :** नाय बाय. पडल्याती पलंगावर; पर लख डोळं करून आढ्याकड बघत्याती! पुसलं तर बोलत बी नायत! डॉक्दर-साहेबावर रुसूनशान् आल्याती जणुं! पन् येत्याल, येत्याल सांजचं घरधनी समजूत काढाया. तवा बोलत्याल अन् खुदकन् हंसत्याल् बी.

( पुनः आंत जावयास निघते, पण पुनः परतून )

**जाई :** पन् म्यां म्हणती, अलीकड लईच रुसत्यात अक्काबाई अन् बोलत बी नाय मागल्यावाणी ! ल्हानपनीं तर लई

अक्षी बोलकी पॉर. आन् आपून जरा का बोललं नाय तर ' जाई, बोल ना ग, जाई बोल ना ग ' असा धोशा ध्यायची ! म्यां तवा पन् म्हनायची, आकाबाय, ल्हान अहांत तोंवर समदं बोलून घ्या; सासऱ्या गेल्यात म्हंजी बोलाया बी नाहीं गवसायचं. माझी मायबाय म्हनं....

चिमणीची चिंवचिंव
माऊलीच्या उबाऱ्यांत
झाली कोकिळा अबोल
सासऱ्याच्या गारठ्यांत

पर बाय....

**इंदिरा :** ( डोळे पुसून ) किती ग बोलते आहेस, जाई ! पुरे तुझं. बाजारांत ना जाणार होतीस ? मधेंच बसलीस आपली दळण काढून.

**जाई :** ( इंदिराबाईच्या भाषणाकडे दुर्लक्ष करून ) पर म्यां म्हणती अक्काबाईच्या लग्नाला तर सहासात वर्सं झाल्यात. सासरीं सासू बी नाय सासरा बी नाय. राजा अन् राणी ! मग आतां कशापाय गप्प बसाव जी ?

( इंदिराबाईचें लक्ष नाहीं असें पाहून )

म्यां मघाधरून बोलून ऱ्हायली; पर बायचं चित्त बी नाय माझ्याकडं ! बाय,....

**इंदिरा :** जाई, जा बरं तूं आतां. म्हणजे संध्याकाळच्या आंत तरी परत येशील.

**जाई** : पर बेबीताय कुठं आल्यात अजून ? त्या आल्या का बहिणीबहिणींचं च्यापाणी करीन अन् मंगशान जाईन.

**इंदिरा** : नको. आतांच जा. बेबीला यायला कदाचित् उशीरसुद्धां होईल. ती एका सभेला गेली आहे. (समजावणीच्या स्वरांत) जा बरं.

**जाई** : अर देवा ! बाय माझी बोलू बी देना ?

( जाते. इतक्यांत धाडकन् दरवाजा उघडून बेबी आंत येते. बेबी २१-२२ वर्षाची अद्यावत् पोषाखांतील कॉलेज तरुणी कुठली तरी सभा जिंकून आलेल्या विजयी मुद्रेनें प्रवेश करते.)

**इंदिरा** : (विणतां विणतां) संपली सभा ?

**बेबी** : हो. तीन चारच भाषणं झालीं. पण त्यांत सगळ्यांत महत्त्वाचं भाषण मीं केलं. तें करीत असतांना अक्काचं इतकं करुण चित्र माझ्या डोळ्यांसमोर होतं ! नवऱ्यानं टाकलेली गरीब बिचारी माझी अक्का ! आजचं माझं भाषण ऐकायला तूं यायला हवं होतंस. आई, कां ग तूं आली नाहींस ?

**इंदिरा** : पण एरवीं तरी मी कुठं जातें सभांना ?

**बेबी** : माझं भाषण ऐकल्यानंतर एकाहि बाईला त्या ठरावाला विरोध करणं शक्य नव्हतं ! इतक्या प्रचंड बहुमतानं आम्हीं सवतबंदीच्या कायद्याला पाठिंबा देण्याचा ठराव पास केला. आतां हा कायदा झाल्यावांचून खास रहात नाहीं........ आजच्या सभेचं महत्त्व तुला तरी अधिक वाटायला हवं होतं, आई ! खुशाल आपलीं पुरुषांनीं बायकांना टाकून लग्नं करायचीं ! बायका म्हणजे काय निर्जीव खेळणीं आहेत

कीं काय ? वाटेल तितके दिवस खेळावं, कंटाळा आला कीं खुशाल फेंकून द्यावं ! असल्या नवऱ्यांना ह्या अन्यायाचा जाब कुणीं तरी नको का विचारायला ?

**इंदिरा :** अग, हवा, हवा, हवा. पण नुसता जाब विचारून काय साधणार आहेस तूं ? अन् किती गोष्टींचे जाब....

**बेबी :** पण निदान एक जाब तर विचारशील ? बाकीच्या अन्यायांची गोष्ट सोड; पण या अन्यायाची झळ, आतां प्रत्यक्ष तुझ्या घराला लागली आहे. प्रत्यक्ष मुलीच्या संसाराला आग लागते आहे आणि तरीसुद्धां तुला कांहीं करावंसं वाटत नाहीं ?

**इंदिरा :** मला नवल वाटतं तुझं, बेबी ! अक्काचा संसार बुडायची वेळ आली तर मला यातना झाल्यावांचून कशा राहतील ?

**बेबी :** राहणार नाहींत खास; पण नुसत्या यातना सोशीत बसल्यानं अन्यायाचा प्रतिकार होतो का ? त्याकरतां लोकमतांत जागृति केली पाहिजे, चळवळ सुरू करून कायद्याचा आधार घेतला पाहिजे.

**इंदिरा :** कायदे करून का माणसांचीं दुःखं नाहींशीं होतात ? इतके कायदे आहेत तरी माणूस दुःखी आहेच.

**बेबी :** बरं जाऊं दे, तुझा कायद्यावर भरंवसा नसला तर. ज्या गोष्टीवर तुझा भरंवसा असेल ती कर. पण अक्कासाठीं कांहींतरी धडपड कर. आपल्या मुलीचं जिवंत मरण तुला उघड्या डोळ्यांनीं पाहवतं तरी कसं ? त्यापेक्षां वसंतरावांचंच कांहीं तरी बरं वाईट झालं असतं.....

**इंदिरा :** हं, बेबी !

बेबी : पहा. त्या अशुभाची कल्पनासुद्धां तुझ्या मनाला सोसत नाहीं; अन् हें जें काय घडतं आहे तें काय कमी अशुभ आहे होय ?

इंदिरा : अग, पण हळू. अक्का वर चांगली जागी आहे. सुन्न झाली आहे. आढयाकडे पहात स्वस्थ पडली आहे. तिच्या कानांवर ही चर्चा कशाला ?

बेबी : पण किती दिवस असं आतां तोंडाला कुलूप घालून गप्प बसायचं ? अक्कानंच खर म्हटलं म्हणजे आतां गप्प बसतां कामा नये.

इंदिरा : खरंच. अक्काच्या आयुष्याचा हा प्रश्न अक्कानंच सोडवायची वेळ आली आहे.

बेबी : अन् समज, अक्का तो सोडवीत नसली तर काय तूंहि स्वस्थ बसणार ? आई, तुला आठवते अक्काच्या लग्नाच्या वेळची गोष्ट ? अक्काचा कल वसंतरावांकडे दिसला आणि बाबांना तें स्थळ पसंत नव्हतं. तरी बाबांनासुद्धां तूं स्पष्ट सांगितलंस कीं वसंतराव किती का गरीब असेनात, अक्काला जर ते आवडले आहेत, तर तिचं लग्न त्यांच्याशींच झालं पाहिजे. आणि तीच तूं आतां स्वस्थ कशी बसते आहेस, आई ? अशानं का अक्काच्या सुखाचा प्रश्न सुटणार आहे !

इंदिरा : कोण म्हणतं सुटणार आहें म्हणून ? आणि मी स्वस्थ बसलें आहें असं खरंच का तुला वाटतं, बेबी ? पण आपल्या आयुष्यांत घडणाऱ्या साऱ्याच गोष्टी प्रयत्नाधीन नसतात. प्रयत्नालासुद्धां दैवाचं पाठबळ....

बेबी : माणसं धादांत अन्याय करतात; त्यांत दैव कसलं? मला नाहीं असला दैववाद कळत!

इंदिरा : एकत्रीसच वर्षांची आहेस अजून. आणखी एकवीस वर्षं गेलीं कीं कळेल.

बेबी : हा आशीर्वाद देतेस तूं मला? मी नाहीं अशी कधीं दैवाला बोल लावून स्वस्थ बसणार. मला प्रयत्न करायचं कळतं.

इंदिरा : मला जें जें शक्य आहे तें तें मी करतेंच आहें की! नाहीं तर श्रीकांताला पत्र पाठवून मीं त्याला कशाला बोलवलं असतं?

बेबी : पण कां तूं इतकी दुसऱ्यावर अवलंबून राहतेस? अन् एवढी तूं त्याची वाट पहात बसली आहेस; पण आला आहे का तो अजून? कशाला तूं त्याची एवढी वाट पहाते आहेस कोण जाणे!

इंदिरा : त्याचीच वाट पहायला पाहिजे अशा वेळीं.

बेबी : अन् तो तरी येऊन काय करणार आहे? तो काय बाबांच्या सारखा नरसिंह अवतार धारण करणार आहे? अन् त्यांतून अक्काचा नवरा म्हणजे तर त्याचा परम मित्र.

इंदिरा : (हंसून) मग तुला तुझ्या दादाचा खरा स्वभाव कळलाच नाहीं म्हणायचा. खरोखर अन्याय होतो आहे असं वाटलं तर श्रीकांत कुणाचीच गय करणार नाहीं.

बेबी : दादा काय करील, सांगूं? कुणाला माहीत काय करील? त्याच्या वागण्याचा अर्थ मला कधीं कळत नाहीं! हंऽ एवढं करील! वसंतरावांना ते किती वेडेपणा करताहेत तें

पटविण्याचा प्रयत्न करील ! पण अशा वेळीं पटविण्या-बिटविण्याचा कांहीं उपयोग नाहीं. अगदीं बडगाच दाखवायला हवा !

**इंदिरा :** त्याचा आपला भरंवसा त्याच्या त्याच उपायावर आहे. खरोखर मन पालटायला हवं असेल तर तें बडगा दाखवून, कायदे करून कसं पालटेल ? त्याकरतां अंतःकरणांतला परमेश्वरच जागा करायला हवा.

**बेबी :** हं ! अंतःकरणांतला परमेश्वर ! अन् तो जागा करायचा ! आई, मला वाटतं, जग निर्माण करण्याच्या श्रमानं तुझा परमेश्वर थकला अन् कायमचा झोंपी गेला !

**इंदिरा :** बरं, बरं ! ( हलक्या आवाजांत ) बेबी, हळूच वर जा बरं, अन् अक्का काय करते आहे, बघून ये.

(बेबी जाते. इतक्यांत दरवाजांतून श्रीकांत येतो. श्रीकांत सुमारें पस्तीस वर्षांचा तरुण आहे. त्याच्यांत गंभीरपणा व खेळकरपणा यांचा सुंदर मिलाफ झाला आहे. )

**श्रीकांत:** काकू !

( पुढें येऊन नमस्कार करतो. )

**इंदिरा :** कोण, श्रीकांत ? मिळालं तुला माझं पत्र ? इतकी वाट पहात होतें मी तुझी !

**श्रीकांत:** नाहीं तरी मी येणारच होतों, काकू

**इंदिरा :** येणार होतास ? बैस ना. कां रे ?

**श्रीकांत:** कारण आजकाल मी वर्तमानपत्रांतून वाचतों आहें, आपली बेबी म्हणे सवतबंदीच्या कायद्याची मोठी पुरस्कर्ती झाली आहे.

**इंदिरा** : होय, बाबा. इकडे वसंतरावचं हें प्रकरण, तिकडे बेबीचीं तसलीं तीं भाषणं....

**श्रीकांत** : म्हणजे आपली आईसुद्धां दुसरेपणावरच दिलेली आहे हें अजून तुम्हीं तिला कळवलं नाहींत ? या चळवळींत तिचं नांव वाचून मी तर चकितच झालों. म्हणून म्हटलं इथं येऊन एकदां....

( बेबी माडीवरून खालीं येते. )

**इंदिरा** : हळू, श्रीकांत. बेबीच येत आहे.

**बेबी** : कशाला तूं मला अक्काकडे पाठवलंस, आई ? ती तर मुकीच्या मुकीच. ( श्रीकांताला पाहून ) —अय्या ! दादा ! केव्हां रे आलास ? अन् कळवलं कां रे नाहींस ? मी नसतें का आलें स्टेशनवर तुला आणायला ?

**श्रीकांत** : ( किंचित् मिस्किलपणानें ) आली असतीस की; पण दिवसा उजेडींच गाडी यायची होती. येईन म्हटलं सोबतीवांचून एकाटासुद्धां घरीं ! पण, बेबी, ( घड्याळाकडे पहात ) या वेळीं तूं घरीं कशी ?

**बेबी** : म्हणजे काय ? या वेळीं म्हणजे काय रे ?

**श्रीकांत** : नाहीं; म्हणजे अजून अंधार कुठं पडला आहे ? अंधाराला भिऊन घरीं लवकर यायचं म्हणजे तो जुना काकूंच्या वेळचा जमाना !

**बेबी** : हो. नाहींच येणार आम्ही अंधाराच्या आंत घरीं. कां तुम्हांला एवढ्या मिरच्या झोंबतात रे ? आतांशीं कुठं आम्ही स्वतंत्रपणं वागायला लागलों. तुमचा पहारा सोडून

हिंडलों तर तुमची नुसती पांचावर धारण बसली आहे ! तुम्हां पुरुषांना वाटतं ....

**श्रीकांत:** ( तिच्याकडे लक्षपूर्वक पहात मिस्किलपणानें ) काकू, अग ही एकाद्या सभेंत भाषण करून आली आहे कीं काय ? बाकी वेषभूषा सभेचीच दिसते आहे ! काकू, तूंहि गेली होतीस कीं काय त्या सभेला ?

**बेबी :** तुझी काकू, अन् सभेला ! अंहं ! ती घरांत माझ्याकरतां स्वेटर करीत बसली होती. माझ्या एका वर्षाच्या थंडीची आईग कोण काळजी ! आणि अक्काच्या सगळ्या आयुष्याचा उन्हाळा व्हायची वेळ आली–दादा, कळलंच आहे सगळं तुला.

**श्रीकांत:** हो, कळलं आहे की. अन् तें बरोबरच आहे. वैवाहिक जीवनाचे नियम हेसुद्धां सृष्टीचेच नियम. लग्नानंतरच्या प्रीति-वसंताच्या पाठोपाठ अतिसहवासाच्या ग्रीष्माची तलखी....

**बेबी :** ( त्याच्या बोलण्याच्या पद्धतीची नक्कल करीत ) पण सृष्टीची तलखी शांत करायला वर्षाकाळच्या जलधारा वाहतात. सवतीसारखी बारामास टिकणारी तलखी नसते ती.

**इंदिरा :** ( थोडी अस्वस्थ. विषय टाळण्यासाठीं ) पुरे, बेबी. दादाला आधीं चहाबिहा तरी घेऊं देशील कीं नाहीं ? चल रे श्रीकांत, आंत.

( जायला निघतात. )

**श्रीकांत:** चल ना. आलोंच आम्ही तुझ्या मागोमाग !

**इंदिरा** : ( वळून श्रीकांत व बेबी यांच्याकडे पाहत ) लवकर या हं. नाहीं तर बसाल पुन: वाद घालीत.

( जातात. )

**बेबी** : केव्हां पोंचलं, दादा, तुला आईचं पत्र ? किती वाट पहात होतों आम्ही !

**श्रीकांत:** आम्ही ? म्हणजे तूंसुद्धां ? ब्रिजला एखादा गडी कमी होता वाटतं ?

**बेबी** : म्हणून तुझी वाट पहात होतों का रे ?

**श्रीकांत:** हें बघ, बेबी, असं दुसऱ्यावर अवलंबून राहण्यांत अर्थ नाहीं. तूं आतां मोठी झालीस. कायद्यांतसुद्धां आलीस. आपल्या मालकीचा एखादा कायमचा गडी शोधीनास ?

**बेबी** : हो. पण तो माझ्या मालकीचा कायमचा राहील याला काय हमी ? तसा कायदा कुठं आहे ? खरंच, दादा, शहाण्या मुलींनीं तुमच्या जातीचा भरंवसा धरूं नये, हेंच खरं.

**श्रीकांत:** आहे, आहे ! बरंच कळायला लागलेलं दिसतंय तुला ! पण कां ग बेबी, आमची जात भरंवशाच्या लायकीची नाहीं, हें त्या जातीचा पुरता परिचय व्हायच्या आंतच तुला कळलेलं दिसतंय ! का दरम्यानच्या काळांत गुपचुप लग्न करून टाकलं आहेस ?

**बेबी** : मी ? मी काय म्हणून गुपचुप लग्न करीन ? चांगलं ताशे-वाजंत्री लावून लग्न करीन. गुपचुप लग्न करायचा हक्क एका विशिष्ट वर्गाचा आहे. बाबा, पहिली बायको टाकून,

माणुसकीला डावलून जेव्हां प्रीतिविवाह करायचा असतो, तेव्हां तो गुपचुप करायचा असतो.

श्रीकांत: अरेच्या! बरंच तंत्र दिसतंय हें दुसऱ्या लग्नाचं. जरा अवघडच आहे शिकायला.

बेबी : पण शिकायचं झालं तर मी देईन सगळी तुला माहिती. पहिली बायको असतांना दुसरीवर प्रेम कसं करावं, पुष्कळ दिवस त्याचा पत्ता कसा लागूं देऊं नये, अन् शेवटीं....

श्रीकांत: काय भाग्यवान् आहेस तूं, बेबी! अग, लोकांना हें ज्ञान व्हायला किती किंमत द्यावी लागते! अन् तूं हें कॉलेजमध्यें बी. ए.चीं लेक्चर्स ऐकतां ऐकतां इतक्या सहज मिळवलंस!

बेबी : कॉलेजांत नाहीं; घरींच. तुझ्या लाडक्या मेव्हण्यांनीं हें ज्ञान आम्हांला अगदीं सप्रयोग दिलं आहे, बाबा!

श्रीकांत: अरे हो! खरंच. वसंता दुसरं लग्न करतोय, नाहीं का? निदान तशी तुमची समजूत झाली आहे. जरा कुठं त्याची एखाद्या मुलीशीं मैत्री झाली असेल—बौद्धिक, नाहीं तर कलात्मक साहचर्यसुद्धां असेल तें! पण तुम्ही बायका ....

बेबी : बौद्धिक नाहीं आणि कलात्मक नाहीं. निव्वळ प्रणयात्मक साहचर्य आहे तें. आणि त्यांचं लग्न होणार अशी आमची समजूत नसून आम्हांला अगदीं साधार माहिती कळली आहे. डॉ. वसंतराव आणि ती उषा का निशा कोणती, त्यांचं लग्न पंधरावीस दिवसांत होण्याचा जबरदस्त संभव आहे. कारण आतां तो सवतबंदीचा कायदा येणार आहे. सध्यां सारा गांव त्या लग्नाची चर्चा करतो आहे.

**श्रीकांतः** खरं ? काय बेटा वसंता भाग्यवान् ! आपल्या लग्नाची चर्चा सगळ्या गांवानं करायची म्हणजे काय ?

**बेबी :** हेवा वाटतो का तुला त्या भाग्याचा ? खरंच, दुसऱ्याच्या मनाची काडीमात्र पर्वा न करतां, आपल्याच मनाचे चोजले पुरविण्याच्या या तुमच्या पुरुषी वृत्तीची मला इतकी चीड आली आहे !

**श्रीकांतः** ( बेबीच्या जवळ जाऊन संथपणें ) अग, पण वसंताशीं लग्न करणारी व्यक्ति एक स्त्रीच आहे ना ?

**बेबी :** ( पाय आपटून ) तीच तर दुर्दैवाची गोष्ट आहे ! किती आनंदांत चालला होता आमच्या अक्काचा संसार ! ही उपा उगवण्यापूर्वीं दोघं नुसतीं सुखाच्या लाटेवर पोहत होतीं.

**श्रीकांतः** होय ना ? नियमच आहे तो. कुठं कुणाच्या सुखाला शीग लागत असली तर तिथं स्त्रीजात आणून उभी करावी ! कीं ती तें सगळं माप अगदीं सपाट करून ठेवते ! अग, इंद्रसुद्धां तपश्चर्येचा भंग करण्याकरितां स्त्रीजात–एखादी अप्सरा पाठवीत असे !

**बेबी :** म्हणजे काय, तपश्चर्या करणारे ते पुरुष होते म्हणून. बायका तपश्चर्या करीत असत्या तर इंद्रानं पुरुषांना पाठवलं असतं.

**श्रीकांतः** पण बायका तपश्चर्या करतील तर ना ? त्या फक्त तपश्चर्या मोडतात !

**बेबी :** कां, बायकांनीं तपश्चर्या केल्या नाहींत वाटतं ? उमा....

**श्रीकांतः** कसं बोललीस !–बायका तपश्चर्या करतात, फक्त एका गोष्टीकरतां–नवऱ्याकरतां; इंद्रपदासारख्या मामुली गोष्टी-

करतां नाहीं. आणि एकदां का त्यांनीं त्या तपश्चर्येला आरंभ केला कीं मग इंद्राचा प्रतिनिधीच काय, पण प्रत्यक्ष इंद्र जरी आला तरीसुद्धां त्या तपश्चर्येचा भंग होत नाहीं. आतां हेंच पहा ना ! उषा नांवाच्या एका मुलीनं वसंताकरतां तपश्चर्या सुरू केली आहे आणि तुम्ही कुणी त्या तपश्चर्येचा भंग करूं शकत नाहीं !

**बेबी** : ( रागानें ) कुणीं करायचा ? जिच्या सुखाची प्रत्यक्ष होळी व्हायची वेळ आली, तिलाच जर कांहीं करावंसं वाटत नाहीं....

**श्रीकांत**: तर तिच्या सुखाची काळजी वाहणारांनीं तें केलं पाहिजे.

**बेबी** : आतां तूंच म्हणालास म्हणून बरं. मुलीच्या सुखाची खरी काळजी आईला ना ? इथं तर अक्काच्या खालोखाल दुसरं कुणी थंड असेल तर ती आई !

**श्रीकांत**: हो. कारण ती तुझ्यासारखी भाषणं करीत नाहीं.

**बेबी** : तसं मुळींच नाहीं. पण दुसरं तरी काय करते आहे आई ?

**श्रीकांत**: तें तुला कसं कळणार ? आपल्या आईला तूंसुद्धां ओळखीत नाहींस, बेबी.

**बेबी** : मला तर बाई, आई कांहीं खटपट करतांना दिसत नाहीं. नुसती झुरतांना मात्र दिसते. पण अशानं कार्य साधतं का ? खरं म्हटलं म्हणजे आतां आपण सगळ्यांनीं मिळून वसंतरावांच्या भोंवतीं नुसतं रान उठवायला हवं.

**श्रीकांत**: बरोबर आहे. पण, बेबी, पुष्कळ वेळां ही रान उठविण्याची नशाच माणसाला इतकी चढते कीं आपण कशा-

करतां रान उठवतों आहोंत हें विसरून जाऊन त्या उठविलेल्या रानांत, गोंधळलेला माणूस स्वतःच सांपडतो !

**बेबी** : (चिडून) झाली, झाली तुझ्या विचक्षणेला सुरुवात. म्हटलंच होतं मीं आईला, कीं दादा येईल अन् प्रत्येकाला त्याच्या कृतीचे हेतू आणि अर्थ, शक्याशक्यता आणि युक्तायुक्तता विशद करून सांगेल. मला नाहीं तुझं हें विशदीकरण कळत. मला सरळ कार्य करायचं कळतं.

**श्रीकांत**: अग, तेंच खरं महत्त्वाचं आहे. सांग बरं, तूं या बाबतींत काय काय कार्य केलंस तें ?

**बेबी** : सवतबंदीच्या कायद्याला पाठिंबा देण्याकरतां आज जी प्रचंड सभा भरली होती तींत सगळ्यांत महत्त्वाचं भाषण मीं केलं.

**श्रीकांत**: ( मिस्किलपणानें हंसून ) मी आल्याबरोबर त्या भाषणांतला कांहीं भाग तूं म्हणून दाखविला होतास खरा ! पुढं ?

**बेबी** : (फुरंगटून) दादा !

**श्रीकांत**: अग, तसं नव्हे. रागावूं नकोस—म्हणजे तुझा आपला भरंवसा सांघिक प्रयत्नांवर आहे. काकूंचा भरंवसा कदाचित् वैय्यक्तिक प्रयत्नांवर असेल.

**बेबी** : अन् तुझा सगळा भरंवसा भाषिक प्रयत्नांवर दिसतोय !

**श्रीकांत**: केव्हांही. काय ग, अन् काकांचा भरंवसा ?

( इंदिराबाई येतात. )

**इंदिरा** : अरे, चहाला येतां ना ?

**श्रीकांत**: हो, आलोंच. अन् काय ग, बेबी, तें नाहीं सांगितलंस. काकांचा भरंवसा....

**बेबी** : बाबांचा भरंवसा ? आवडतात मला त्यांचे ते मार्ग. त्यांचा भरंवसा अगदीं काठिक प्रयत्नांवर आलाय ! पहिल्या दिवशीं त्यांनीं वसंतरावांच्या लग्नाची बातमी ऐकली अन् असे संतापले म्हणतोस ! वसंतराव दिसायला हवे होते समोर, बाबांच्या सोट्याशींच गांठ पडली असती ! अन् असंच पाहिजे. हीं माणसं आतां समजावणीच्या लायकीचीं राहिलेलीं नाहींत ! आपण काय करतों आहोंत याचंसुद्धां त्यांचं भान विसरलं.

(इतक्यांत बाबासाहेब ऑफिसच्या पोशाखांत "कोण भान विसरलं ?" असें म्हणत आंत येतात. बाबासाहेब हे हुशार, कर्तृत्ववान् व विरोधाची फारशी संवय नसलेले सरकारी अधिकारी आहेत.)

**श्रीकांत** : नमस्कार करतों, काका !

**बाबा** : कोण, श्रीकांत ? अन् तूं केव्हां आलास ? हं, तुझ्या काकूचं पत्र तुला पोंचलेलं दिसतंय. आपल्या पुराणांत—अरे, पुराणांत कशाला—आजकालसुद्धां बहिणींनीं भावांचा धांवा केल्याचीं पुष्कळ उदाहरणं आहेत; पण एखाद्या संकटांत चुलतीनं पुतण्याचा धांवा केल्याचं हें पहिलंच उदाहरण असेल.

(हंसतात.)

**श्रीकांत** : छे, छे ! धांवा कसला त्यांत ? काकूंनीं मला नुसतं काय काय चाललं आहे एवढंच कळवलं होतं आणि अशा चमत्कारिक परिस्थितींत मला कळविण्यावांचून ती तरी काय करणार ?

**बेबी** : चमत्कारिक परिस्थिति कशानं ? दुसरीं माणसं मूर्खपणा

करतात, त्यांत आईची परिस्थिति चमत्कारिक व्हायला काय झालं ?

बाबा : बेबी, तुझ्या आईबद्दल तूं कांहीं सांगूं नकोस. तिच्या मनाचा थांग तुला लागणं शक्य नाहीं. सत्तावीस वर्षं होऊन गेलीं आमच्या लग्नाला; पण तिच्या मनाचा थांग अजून मलासुद्धां पुरता लागला आहेसं वाटत नाहीं !

श्रीकांत: काकूची या बाबतींत खरंच चमत्कारिक परिस्थिति....

बेबी : आतां मात्र कमाल झाली दादाची. खरे निर्लज्जपणानं वागतात हे दुसरं लग्न करणारे लोक....

बाबा : हं, बेबी ...

बेबी : अन् त्यांच्याशीं लग्न करायला तयार होणाऱ्या या पाषाण-हृदयी बायका ! मीं आज सभेंत हेंच सांगितलं, कीं या दुसरं लग्न करणाऱ्या लोकांना माणुसकीचे धडे देण्यांत अर्थ नाहीं. यांना कायद्याचाच बडगा दाखवायला हवा.

(बाबासाहेब व इंदिराबाई चपापतात. क्षणमात्र गोंधळून एकमेकांकडे पाहतात. त्यांतून श्रीकांत वाट काढतो. )

श्रीकांत: बेबी, अग, किती वेळ झाला मी आल्याला ? काकासुद्धां आले. चहाची तरी कांहीं काळजी करशील कीं नाहीं ?

बाबा : बेबी, तूं आंत चहाची व्यवस्था बघायला जा. ( ती जात नाहींसें पाहून तीव्रतेनें ) जा म्हणतों ना ? आम्हांला इथं कांहीं खाजगी बोलायचंय.

बेबी : माहीत आहे मला, तुम्हांला काय खाजगी बोलायचं आहे तें ! मुत्सद्देगिरीचे डाव टाकायचे आहेत; पण लक्षांत ठेवा— तुम्ही मान्य करा किंवा न करा, मी काळीं निशाणं घेतलेल्या

हजार विद्यार्थिनींचं पथक घेऊन वसंतरावांच्या या लग्नाच्या वेळीं हजर राहीन आणि सारखी घोषणा करीन कीं 'वसंत, गो बॅक', 'उषा, गो बॅक,' 'वसंत, उषा, गो बॅक' !

**बाबा** : छान, छान ! घोषणा अवश्य कर. पण आधीं आंत जाऊन चहा कर.

(बेबी चडफडत आंत जाते. जातां जातां बडबडते — लहान माणसं म्हणजे जशीं काय खिजगणतींत नाहींत यांच्या !" )

**बाबा** : (ती गेलीसे पाहून) हें अस्सं चाललं आहे घरांत ! वसंतरावांचं हें प्रेमप्रकरण सुरू झाल्यापासून आम्ही यांना म्हणतों आहोंत, सांगून टाकू मुलींना एकदां आपल्या लग्नाचा इतिहास. पण यांना तें पसंत नाहीं. तें कामसुद्धां त्यांनीं तुझ्यासाठीं राखून ठेवलं आहे. कळलंच आहे तुला, तुझ्या मित्रवर्यांनीं काय दिवे लावायचे ठरवलं आहे तें.

**श्रीकांत**: हं.

**बाबा** : शिकवा जरा त्यांना चार शहाणपणाच्या गोष्टी ! इतकी सुस्वभावी आज्ञाधारक मुलगी बायको मिळाली आणि यांचं म्हणे आतां दुसऱ्याच एका मुलीवर प्रेम बसलं ! करंट्याचीं लक्षणं, दुसरं काय ? पण महाराज, या बाबासाहेबांशीं गांठ आहे म्हणावं; पहातों कसं लग्न होतंय तें !

**श्रीकांत**: पण काका, तुम्ही तऽऽर (सावरून घेत) नाहीं, म्हणजे मी म्हणतों तुम्ही हें लग्न कसं मोडूं शकणार ?

**बाबा** : कां ? आम्हीं स्वतः दुसरं लग्न केलंय म्हणून होय ? आमचं दुसरं लग्न म्हणजे काय अपराध समजतो आहेस तूं ? तुझ्या

काकानं गाढवपणा केला असं वाटतंय तुला? अरे मूर्खा, आम्हीं दुसरं लग्न केलं; पण आमची गोष्टच वेगळी होती! एकीशीं लग्न करून, मग दुसरीच्या नादीं लागून, तिच्या प्रेमानं बेजार झाल्यावर मग आम्हांला पहिली बायको नकोशी नाहीं वाटली! पहिल्यापासूनच आम्हांला तें पसंत नव्हतं. आम्ही यांना सरळ पहायला गेलों होतों; काय हो? ( इंदिराबाई स्तब्ध. ) आमचा आपला धोपट मार्ग. तुम्हां लोकांचीं हीं प्रेमाचीं लक्षणंहि आम्हांला कधीं कळलीं नाहींत, आम्ही कधीं या प्रेमाच्या भानगडींत पडलों नाहीं. आणि त्यामुळं आम्ही कोणाचे मिंधे नाहींत. वसंतरावांचं हें प्रकरण या थराला येणार आहे असं जर यापूर्वीच आम्हांला वाटलं असतं, तर सतरा खटपटी करून त्या पोरीला या गांवांतून पिटाळून लावली असती आणि हें प्रेमाचं मूळच उपटून टाकलं असतं. बेबीची मात्र नजर खरी हं! ती कार्टी हें आम्हांला कांहीं दिवस सांगत होती; पण आम्हांला ती दृष्टिच नाहीं!

**श्रीकांत:** आणि आतां हें प्रकरण या थराला गेल्यावर हें लग्न मोडणंहि सोपं नाहीं! असा धाकदपटशा दाखवून का कुठं लग्नं मोडतात?

**बाबा :** (संतापून) मोडत नाहींत? मोडलीं पाहिजेत–निदान हें लग्न तरी खास मोडलं पाहिजे. आपल्या प्रेमाचे लाड पुरविण्याकरतां आपण कुणाच्या हक्काची पायमल्ली करतों आहोंत याची वसंतानं आठवण ठेवली पाहिजे. तो विसरलेला दिसतोय; पण माझ्याशीं गांठ आहे म्हणावं. तुझी बायको म्हणजे कांहीं कुणी पोरकी पोर नव्हे. मीं

माझ्या अक्काला एखाद्या संस्थानिकाला नाहीं तर कलेक्टराला दिली असती; पण हा पोरगा खरोखर हुशार, होतकरू, शिवाय तुझा मित्र, अन् यांचा आग्रह म्हणून त्याला मुलगी दिली. काय हो? शिक्षणाला मदत केली. राजपुत्राच्या आरामांत राहून वाटेल तितका शीक म्हटलं. तुझा सासरा इथं बसला आहे खर्च करायला! अन् पोरगा खरोखरच हुशार. सगळ्या परीक्षांत पहिला. इतकी धन्यता वाटली आम्हांला आमच्या निवडीची! वाटलं, अक्का भाग्याची म्हणून तिला असा हुशार नवरा मिळाला. पण आतां हे हुशार चिरंजीव लागले आपले गुण उधळायला!

**श्रीकांत:** मग तुम्हीं त्याला आपल्या उपकारांची आठवण देऊन त्याचं मन वळविण्याचा कांहीं प्रयत्न केलाच असेल.

**बाबा :** मनं वळवायचीं कामं, हीं तुमचीं कामं आहेत, श्रीकांत; आमचीं नव्हेत.—त्यांतून तो पोरगा हट्टी आहे. आमचा अपमानसुद्धां करायचा एखादे वेळीं!

**श्रीकांत:** मग हें लग्न तुम्ही मोडणार कसं?

**बाबा :** कां? आम्हीं त्या मुलीला गांठायची व्यवस्था केली आहे. तो तिचा पालक कोण चैतन्यदेव का कोण त्याचा शोध लावून त्याच्या मार्फत आम्ही तिची भेट घेणार आहोंत.

**श्रीकांत:** पण तिला तुम्ही काय सांगणार? ती कदाचित् म्हणेल कीं आपल्या जांवयाला आधीं आंवरा; मग मला उपदेश करा.

**बाबा :** हें तूं म्हणशील!—ती मुलगी आहे, आर्य स्त्री आहे; ती नाहीं असं म्हणणार! आणि म्हणालीच तर आम्ही तिला स्पष्टच विचारूं कीं आगरकर-कर्व्यांनीं तुमच्या शिक्षणा-

करतां देह झिजवले, त्याचं हें सार्थक काय? तुला कसला नवरा पाहिजे बोल, मी शोधतों. त्याला हजारों रुपये हुंडा मी देतों—त्या पोरीला कुणी नात्याचीं माणसं नाहींत म्हणे! आम्ही तिला आपली मुलगी मानूं. पण आमच्या किशोरीचा संसार बुडतां कामा नये. काय हो!

**श्रीकांत**: पण, काका, हें तुमच्या पिढींतलं दुसरं लग्न नव्हे. हा आजकालचा प्रीतिविवाह आहे.

**बाबा** : अरेच्या! पण प्रत्येक विवाह हा प्रीतिविवाह असलाच पाहिजे असं कांहीं शास्त्र तर नाहीं ना? आमचा कुठं आहे प्रीतिविवाह? पण सत्तावीस वर्षं आम्हीं कशीं आनंदांत, सुखांत काढलीं. काय हो! (इंदिराबाई स्तब्ध.) हें प्रेमाचं पीक अलिकडेच फार वाढलेलं दिसतंय. ऐकावा तो म्हणे प्रीतिविवाह! आम्ही म्हणतों, अरे, प्रीति करा; पण विवाह कशाला? अन् त्यांतल्या त्यांत पहिली बायको जिवंत असतांना प्रीतिविवाह आम्हांला साफ नापसंत आहे.

**श्रीकांत**: म्हणजे तुमचं म्हणणं असं दिसतंय, काका, कीं पहिली बायको जिवंत असतांना दुसरं लग्न करायला हरकत नाहीं; फक्त तो प्रीतिविवाह नसावा.

**बाबा** : अलबत्! दोन लग्नं केलीं तरी दोघींचाहि संसार होऊं शकतो. पण दुसरा प्रीतिविवाह म्हणजे पहिलीचा संसार खलास! आतां पहिलींत कांहीं दोष असेल तर गोष्ट वेगळी. पण इथं तर चांगली सोन्यासारखी बायको. गेल्या वर्षापर्यंत याची अक्कावर प्रीति होती; यंदा म्हणे उडाली! दुसरीवर बसली! अरे, वारे प्रीति! परवांपरवांपर्यंत यांची अक्कावरची

प्रीति पाहिली, तेव्हांच मला वाटलं कीं हें लक्षण ठीक नाहीं; कारण आज जो एकीवर प्रेम करतो, तो आज ना उद्यां दुसरीवर करणारच ! त्यापेक्षां आही बरे. आम्हांला तुमचं हें प्रेमाचं गौडबंगाल कळतच नाहीं. काय हो?

**श्रीकांत:** नसेल कळत. पुष्कळांना तें कळत नाहीं म्हणे !

**बाबा :** कवींना अन् लेखकांना तें कळतं असं ऐकलं होतं. डॉक्टरला कळतांना तर आतां पहातोंच आहें. अन् तुला कळतं. बाकी जगांत तुला सारंच कळतं म्हणा. निदान तुझ्या काकूला तरी तसं वाटतं; पण आम्हांला आतां ह्या वयांत तें कळवून घेण्याची जरूरहि नाहीं अन् इच्छाहि नाहीं.

**इंदिरा :** आतां माझं ऐकायचं का जरा—वसंतरावांचं त्या मुलीशीं लग्न होऊं नये अशी तुमची इच्छा आहे ना? अन् त्या मुलीशीं बोलणार आहात ना तुम्ही? मग तिचं मन तुम्हांला समजून नको का घ्यायला?

**बाबा :** त्यांत काय समजायचंय? सरळच गोष्ट आहे ती. ती तरुण मुलगी आहे, तिला लग्न करावंसं वाटणं साहजिकच आहे. आपण तिच्याकरतां एखादा हुशार मुलगा शोधूं—तिला डॉक्टरच हवा असेल तर तोसुद्धां शोधूं.

**इंदिरा :** अहो, पण ती डॉक्टर वसंतरावावर प्रेम करते आहे. आपण शोधून आणलेल्या कुठल्याहि हुशार डॉक्टरवर ती प्रेम करील असं का वाटतं तुम्हांला?

**बाबा :** म्हणजे काय, बायका प्रेम करतात तें एखाद्या गुणावरच ना?

**इंदिरा :** डॉक्टरकी हा धंदा आहे; गुण नव्हे.

बाबा : गुण नव्हे? अरे बापरे! तुम्हालांहि हें प्रेमाचं तंत्र कळायला लागलं कीं काय?

इंदिरा : काय भलभलतं बोलावं माणसानं! तुम्हांला हें लग्न मोडायचं ना? अन् तेंसुद्धां त्या मुलीचं मन वळवून मोडायचं ना? मग पहिली गोष्ट लक्षांत ठेवा, कीं वसंताच्या जागीं दुसरीं हुशार मुलं आणून उभीं करतों, हुंडा देतों, ही भाषा बोलायची नाहीं! ती शिकलेली मुलगी आहे, तिला हुशार माणसं भेटलीं आहेत अन् त्या सगळ्यांना बाजूला सारून ती वसंतरावांवर प्रेम करते आहे! तिचं मन वळवायचं असेल तर तिच्या प्रेमाची अशी थट्टा करूं नका.

बाबा : थट्टा करूं नका म्हणजे? आम्हांला हें प्रेमच मंजूर नाहीं.

श्रीकांत: पण काका, दुसऱ्याकडून मंजूर करून घ्यायला प्रेम म्हणजे काय रजेचा अर्ज आहे का? मनुष्य प्रेम करतं तें एखाद्या व्यक्तीवर करतं; कांहीं गुणांच्या बेरजेवर करीत नाहीं. हेंच पहाना, या गांवांत तरुण हुशार डॉक्टर काय कमी आहेत? कांहीं लग्नाचेसुद्धां असतील. पण ते या मुलीला दिसले नाहींत. प्रेम करतांना दिसला तो फक्त आपल्या अक्काचा नवरा. हेंच तर त्या प्रेमाचं चमत्कारिक तंत्र आहे! अमुक एक गुण प्रेमाला पात्र असं ठरवतां आलं असतं तर मतदारांच्या याद्यांसारख्या, आपण प्रेमाला पात्र असलेल्या माणसांच्या याद्यासुद्धां केल्या असत्या; पण दुर्दैवाची गोष्ट कीं तशा याद्या करतां येत नाहींत.

बाबा : मग काय आम्हीं हा प्रीतिविवाह उघड्या डोळ्यांनीं पहावा असं तुमचं दोघांचंहि म्हणणं?

**श्रीकांत:** तसं नव्हे, काका. पण धाकदपटशा दाखवून किंवा वसंताच्या जागीं दुसरा मुलगा उभा करून होण्यासारखी ही गोष्ट नाहीं, असंच माझंहि मत !

**बाबा :** धाकदपटशा नको; मग काय तिच्या पायां पडूं म्हणतां तुम्ही ?

**श्रीकांत:** वेळ आली तर तेंसुद्धां करायची तयारी ठेवावी लागेल. आपण त्या मुलीचं मन पालटण्याचा प्रयत्न करतों आहोंत. जुलूमजबरदस्तीनं कुठं हृदयपालट होत असतो का ?

**बाबा :** छे ! छे ! ! तुमचं हें हृदयपालट तंत्र आपल्याला बिलकुल पसंत नाहीं. आम्हांला एक गोष्ट माहीत आहे. एखाद्याशीं विरोध दाखवायचा म्हणजे त्याला सरळ सामना द्यायचा.

**श्रीकांत:** पण, काका, हा सामना तुम्ही कुणाशीं देतां ? हा सामना व्यक्तीशीं नाहीं; मानवी अंतःकरणाशीं आहे. आजपर्यंत वापरलेलीं हत्यारं या सामन्यांत तुमच्या उपयोगीं पडायचीं नाहींत.

**बाबा :** हें बघ, श्रीकांत, आम्हांला तुमचे हे मार्ग कळत नाहींत. तुझ्या काकूला कळतात अन् पटतातहि. पण आम्हीं जगांत चार पावसाळे जास्त काढले आहेत. तुमच्या वळवण्या—पटवण्याच्या मार्गांनीं कांहीं होणार नाहीं अशी आमची खात्री आहे. श्रीकांत आणि तुम्ही या बाबतींत काय करायचं याची चर्चा खुशाल करा. प्रत्यक्ष कार्य आम्ही आमच्या मार्गानं करूं.

(बाबासाहेब जातात.)

**श्रीकांत:** काकू, आहे काय हा प्रकार ? आपण स्वतः तीच चूक केली असतांना काका जांवयावर रागावताहेत आणि त्या

परक्या मुलीला दमदाटी करण्याच्या गोष्टी बोलताहेत ! बेबी तिकडे सभेंत भाषणं करून स्त्रियांना दोष देते आहे. तिला म्हणावं, गप्प तरी बस. कशी तुम्हीं तिला प्रत्यक्ष तुमच्या लग्नाबद्दल अजून अंधारांत ठेवलीत ! तुमच्या या लपवालपवीमुळं पाहिलंस ना आत्तांच किती चमत्कारिक परिस्थिति निर्माण झाली होती ती ?

**इंदिरा :** अस आतांशा नेहमींच होतं. हें वसंतरावाचं प्रकरण सुरू झाल्यापासून हे वसंतरावावर रागावतात. बेबी त्या मुलीला दोष देते.

**श्रीकांत:** काकू, तूं खरोखर चूक केलीस. याच्यापूर्वींच कां नाहीं तूं आपल्या लग्नाचा इतिहास मुलींना सांगितलास ? निदान आतांच्या परिस्थितींत मुलींशीं तरी तुला मोकळेपणीं बोलतां आलं असतं.

**इंदिरा :** होय, बाबा. नाहीं सांगितलं खरं. पण तसा कधीं प्रसंगच आला नाहीं पूर्वीं. अन् आतां हा आला तो असा अचानक झडपच घालून आला ! तूंच पहा हं. माझं लग्न झालं आणि तुझ्या पहिल्या काकू एकदम त्रागा करून ब्रह्मदेशांत आपल्या भावाकडे गेल्या आणि त्यांनीं इकडला संबंधच अजिबात सोडला. त्या रागामुळं सासूबाईंना तर त्यांचं नांवसुद्धां काढलेलं आवडत नसे; म्हणून घरांत कधीं ती गोष्टच निघाली नाहीं. आम्हीहि बदलीच्या निमित्तानं गांवोगांवीं जात असल्यामुळं भोंवतालच्या मंडळींनाहि तें कळण्याचं कारण नव्हतं. पुढं मुली मोठ्या झाल्या—सासूबाई गेल्या. पण इतक्यांत तुझ्या पहिल्या काकू ब्रह्मदेशांत वारल्याची बातमी आली आणि त्या प्रकरणावर

शेवटचाच पडदा पडला. मग तूंच सांग, कशाला या मुलींना ती गोष्ट सांगावीशी मला वाटणार ?

**श्रीकांत:** काकू, तें खरं ग; पण....

**इंदिरा :** अरे, तेंच सांगतें ना ! आतां हें वसंतरावाचं प्रकरण सुरू झाल्यापासून माझा जो कांहीं चोहोंकडून कोंडमारा झाला आहे, त्याची आली तर तुलाच कल्पना येईल. यांचा एक मार्ग; बेबीचा दुसरा. अन् अक्कानं तर कुठल्याहि तऱ्हेनं कांहींच बोलायचं नाहीं असं ठरवलेलंच दिसतंय! मी तरी काय करणार ? म्हणून पत्र पाठवून तुला बोलावलं. म्हटलं, अशा परिस्थितींत तूंच वसंतरावाशीं कांहीं बोलूं शकशील.

**श्रीकांत:** खरं, काकू; पण वसंतासारख्या स्वभावाच्या माणसाला कोणत्याहि निश्चयापासून परावृत्त करणं कठीण आहे. अगोदर पुरुष आणि त्यांतून तो जात्या हट्टी ! असा मनुष्य प्रेमाच्या भोंवऱ्यांत सांपडला तर त्याला त्या भोंवऱ्याच्या बाहेर काढणं फार दुरापास्त आहे.

**इंदिरा :** अगदीं खरं आहे. फार झालं तर वसंतरावाचं हें लग्न होऊं नये म्हणून आपण खटपट करायची. तसं झालं तरी अक्काच्या संसाराला एकदां तडा गेला तो गेलाच! आतां संसार करायचा म्हणजे आपला लोकदृष्टीला देखावा. (किंचित् विचारपूर्वक) खरं सांगूं, श्रीकांत, माझ्या मनांत तर पुष्कळ वेळां त्याच मुलीचा विचार येतो. वाटतं, कोण बिचारी ह्या आगींत उडी घालायला तयार झाली आहे! तिला कल्पनाहि नसेल कीं सवतीवर संसार म्हणजे तोंड

दाबून बुक्क्यांचा मार ! त्यांतून यांच्यासारख्याशीं गांठ ! उद्यां हें लग्न झालं तर हे त्या मुलीचं जीवन असह्य केल्या-वांचून खास रहाणार नाहींत.

**श्रीकांत:** हो. पण हें करायची वेळच काकांना न आली तर बरं.

**इंदिरा :** तें तर खरंच रे. म्हणूनच तर तुला बोलावलं. म्हटलं तूं वसंतरावांना कांहीं सांगितलंस तर अक्काला निदान हें अपमानाचं आयुष्य तरी कंठायला नको.

**श्रीकांत:** हो. भेटतोंच मी आतां वसंताला. पहातों प्रकरण कोणत्या थराला गेलं आहे तें. त्याच्याकडून माझी निराशा झाली तर त्या मुलीची ओळख करून घेऊन तिचं मन वळवण्याचा प्रयत्न मी माझ्या पद्धतीनं करून पहातों. मात्र हें सगळं होईपर्यंत तूं कसंहि करून काकांना थोपवून धर. त्यांना म्हणावं, तुम्हींच जर असं रान उठवलंत तर मात्र बिथरून जाऊन वसंता नक्की लग्न करील आणि हा मामला जास्तच बिघडेल. सांगशील ना तूं एवढं ?

**इंदिरा :** होय, बाबा. पहातें प्रयत्न करून. पण श्रीकांत, तुला माहीत आहे यांचा स्वभाव. कुणाला माहीत ऐकतात की नाहीं ?

**बेबी :** ( आंतून बाहेर येऊन ) आई, दादा, चहाला येतां ना ? बाबा थांबले आहेत तुमच्याकरतां.

( पडदा )

## अंक दुसरा

(डॉ. वसंतरावांचें घर. वसंतराव एकटेच. वसंतराव सुमारें तेहतीस वर्षांचे. दिसायला नीटस. सध्यां ते थोड्या व्यग्र मनःस्थितींत दिसत आहेत. घंटा वाजते व चैतन्य दरवाजांतून येतात. —चैतन्य एक वयस्क परप्रांतीय गृहस्थ.)

**वसंत :** आँ चैतन्य ? तुम्ही ? अन् या वेळीं कसे ?

**चैतन्यः** तुम्ही आम्हाला माफ करतो. डॉक्टर, तुमचा उषा तो ट्रिपला गेला तो आम्ही इकडे आला.

**वसंत :** मी नाहीं समजलों. उषा ट्रिपला गेली म्हणून तुम्ही इकडे आलां ?

**चैतन्यः** (रागावून) अरे डॉक्टर, उषा इथें असतो तर तूं सारखा तिच्याशीं गोष्टी करतो—मी म्हटला आतां आम्ही तुझ्याशीं बोलतो—सगळा मोकळा बोलतो. तूं ऐकतो ?

**वसंत :** वा, चैतन्य, मी तुमचं ऐकणार नाहीं असं कसं होईल ?

**चैतन्यः** तो आम्ही म्हातारा तुला Advice करतो का हा उषा Affair लवकर मिटव. ते पोरीचे कष्ट आम्ही नाहीं पाहूं शकतो ! तुम्ही लग्न कां नाहीं करतो ? नुसता इतका मैत्री करतो, तो कशाला करावा ?

**वसंत :** नाहीं हो, चैतन्य, आम्ही आतां लग्नाचाच विचार करतों आहों.

**चैतन्यः** अरे, विचार, विचार, तो किती विचार करतो? आतां विचार करतो तो पूर्वी कां नाहीं करतो? तिला इतका जीव लावतो तो लग्न कर. मी त्या पोरीला बी काल रागावला आन् सांगितला, का तुला आता डॉक्टरकडे जाऊं नाहीं देतो! डॉक्टर, तिच्याकरतां माझा जीव फार कष्टी होतो. पोरगी फार चांगला! लोकाचे पण ब्रह्म-देशापासून आम्हांला तिची माया लागले. आम्ही अर्धा घास तिला देतो! इतका कष्ट सोसून आम्ही हिंदुस्थानांत आले! तिचा लग्न होतो तर आतां आम्ही सुखानी जातो! तुम्हीं मैत्री केला तर आम्हीं म्हटला चांगला झाला. पण तुम्ही मॅरेज नाहीं करतो! तो तुझी दुसरी बायको होतो तर काय जातो? आम्ही हिंदु लोक तसा करतो. भगवान् कृष्णसुद्धां करतो! अरे, तो पोरगी तुझ्या बायकोशीं चांगला वागेल. मी तिला सांगणार, "कुरु प्रियसखीवृत्तिं सपत्नीजने". अरे, आम्ही तुम्ही होतो तर तिरुपतीला जाऊन लग्न करतो.

**वसंत :** पण ती ट्रिपहून आली कीं आम्ही ठरवतोंच हें.

**चैतन्यः** लग्न ठरवतो! तो फार चांगला होतो. पण, डॉक्टर, लक्षांत ठेवतो. लग्न नाहीं करतो तो तूं तिला भेटूं नाहीं शकतो! छे छे—इतका दिवस वाट पाहिला तो बस झाला. आतां लग्न करतो तर तिला भेटतो; नाहीं तर नाहीं भेटतो. ते पोरीला पण मी सांगितला.

**वसंत :** पण, चैतन्य, लग्न ठरविण्याकरतां तरी आम्हांला दोघांना भेटायला नको का ?

**चैतन्य:** त्याला तो एक भेट बस होतो. ते एक भेटला लग्न नाहीं ठरते तो पोरगी पुन्हां तुझ्या दृष्टीस नाहीं पडते. एक भेट घे.

**वसंत :** पण त्याकरता ती टिपहून आली कीं लगेच मला कळवाल का ?

**चैतन्य:** हां मी कळवतों; पण सांगितला तो नीट लक्षांत धर. मी आतां जाते.

(जातो. डॉक्टर अस्वस्थ मनःस्थितींत. थोड्या वेळांत पुनः घंटा वाजते.)

**वसंत :** या. कोण आहे ? दरवाजा उघडा आहे.

**जाई :** ( दरवाजांतून ) मी, जाई.

**वसंत :** कां ग, जाई ? निरोप आणला आहेस वाटतं कांहीं ?

**जाई :** व्हय जी. अक्काबायच येनार व्हत्या; पर श्रीकांतदादा आल्याती. तवा एक दोन दिसांनीं येत्याल असं सांगितलंय.

**वसंत :** कोण ? श्रीकांत आला आहे ? केव्हां आला ?

**जाई :** काल, दोपारचंच आल्यात.

**वसंत :** अस्सं. अन् अजून इकडं नाहीं आला ? बरं, जाई, तुझ्या अक्काला म्हणावं थोडा वेळ ये आणि मग परत जा हवी तर.

**जाई :** व्हय जी.

( पण जाई परत जाण्याऐवजीं उभीच आहे. )

**वसंत :** कां ग, जाई, आणखी कांहीं निरोप आहे का ?

**जाई** : नाय. अक्काबायनीं सांगितलाय झाडलोट करून कांहीं हवं नको बघून ये—रामा न्हाय म्हणून.

**वसंत** : नको. रामा आला सकाळींच परत. जा तूं.

( तरी जाई उभीच आहे. तें पाहून– )

**वसंत** : कां ग ?

**जाई** : ( जाई पदराखालून डबा काढीत ) नाऽऽय—मोठ्या बायनीं हा फराळाचा डबा दिलाय.

**वसंत** : ( त्रासल्यासारखा ) फराळाचा डबा दिलाय ? बरं ठेव. जा तूं.

( जाई जायला निघते. त्याच दरवाजांत उषा उभी. क्षणमात्र दोघींची दृष्टादृष्ट होते. वसंत अगदीं अस्वस्थ मनःस्थितींत, अगदीं विषण्णावस्थेंत टेबलाच्या शेजारीं असलेल्या खुर्चीवर बसलेला. डोक्यास हात लावून अतिशय विचारमग्न स्थितींत आहे. उषा आंत येते. वसंत आपल्याच विचारांत मग्न आहे.–आपल्याकडे त्याचं लक्ष वेधून घेण्यासाठीं उषा रिकाम्या खुर्चीवर आपल्या हातांतील पर्स जोरानें आपटते. तो आवाज ऐकून वसंत विचारतंद्रींतून जागा होऊन— )

**वसंत** : कोण ? उषा ? मैत्रिणींच्या बरोबर आज तूं ट्रिपला गेली होतीस ना ?

**उषा** : हंः!

**वसंत** : मग गेली नाहींस ?

**उषा** : गेलें !

**वसंत** : गेलीस ? मग इतक्या लवकर परत कशी आलीस ? दोन दिवसांनीं येणार होतांत ना ?

**उषा** : हो. पण मी आधींच आलें !

**वसंत** : केव्हां आलीस ?

**उषा** : आत्तांच. तशीच इकडे आलें.

**वसंत** : म्हणजे काय, उषा ?

**उषा** : म्हणजे काय ? वसंत ! मैत्रिणींच्या बरोबर हिंडणं अशक्य झालं.

**वसंत** : मैत्रिणींना अर्ध्या वाटेंतच सोडून परत आलीस ? त्या सगळ्या जणींना तुझं माथं फिरल्याची शंका खास आली असेल.

**उषा** : शंका कशाला ? खरंच आहे तें.

**वसंत** : हो. पण आलीस तर निदान छत्रीबित्री तरी घेऊन यायचंस ?

**उषा** : छत्री ? हं: !

**वसंत** : कां ऊनबीन नाहीं वाटतं ?

**उषा** : आहे. म्हणूनच सांवली शोधायला आलें. अगदीं मैत्रिणींच्या घोळक्यांतसुद्धां वावरणं आज मला अशक्य झालं. म्हणून,

( एकदम आंतल्या दरवाजाकडे जावयास निघते. वसंत तिला अडवीत असतां— )

**वसंत** : अग हो, पण निघालीस कुठं तूं ?

**उषा** : आंत. अक्काकडे.

**वसंत** : किशोरीकडे ?

**उषा** : हो. माझं काम आहे त्यांच्याकडे.

**वसंत** : मला सांग ना, काय काम आहे तें.

**उषा** : तुला सांगण्यासारखं असतं तर सांगितलं असतं. पण आज मी त्यांनाच भेटण्याकरतां आलें आहें. त्यांच्याचकडे माझं काम आहे. जाऊं दे मला.

( दारापर्यंत जाते. )

**वसंत** : अग, पण ती घरांत नाहीं. कालपासून ती माहेरीं गेली आहे.

**उषा** : (अगदीं हताश) माहेरीं गेल्या आहेत ? केव्हां येतील ?

**वसंत** : म्हणजे ? एकट्या किशोरीला सांगण्यासारखं असं काय काम आहे ?

**उषा** : काय काम ? काय काम ! काय काम ! वसंत, तुला माहीत आहे. किती दिवस आतां तुझ्यापासून मी दूर राहूं ? आजच्या आज त्यांना भेटून त्यांची संमति घ्यायला आलें होतें. हें अनिश्चित जीवन मला आतां असह्य....

( एकदम खुर्चीत बसून रडूं लागते. )

**वसंत** : आणि मला सुसह्य आहे का, उषा ? आपल्या लग्नाबाबत कांहींतरी मार्ग शोधण्याचाच मी विचार करतों आहें. आणि म्हणूनच मीं तुला चारपाच दिवस भेटूं नकोस असं सांगितलं होतं ना ? मग कां आलीस इथं ? कां माझा इतका अंत पाहते आहेस, उषा ?

**उषा** : मी तुझा अंत पाहतें आहें कीं तूं माझा अंत पहतो आहेस ? तुला पाहिल्यावांचून, भेटल्यावांचून चारपांच दिवस राहूं ? अशक्य आहे. वसंत, भोंवतालच्या जगांत मी वावरतें, नोकरी करतें, मित्र-मैत्रिणींच्या घोळक्यांत हिंडतें; पण सगळं वागणं यांत्रिक, निर्जीव ! आणि त्याच वेळीं दुसरें एक जीवन मी जगत असतें. जिवंत, तुझ्या सहवासांतलं. तें काल्पनिक जीवन हेंच माझं आजकालचं खरं जीवन झालं आहे. चारपांच दिवस भेटूं नकोस असं म्हणालास; मग माझ्या त्या जीवनांतून बाहेर कां रे गेला नाहींस ?

**वसंत** : तूं जाऊं दिलं असतंस तर गेलों असतों. पण....

**उषा** : मला भेटायला बंदी केलीस. पण तुला आठवण तरी आहे का, वसंत ? परवां संध्याकाळीं तूंच माझ्याकडे आलास, तासभर कांहींतरी बोललास आणि परत गेलास ! तूं काय बोलत होतास तें तुझं तुला तरी कळत होतं कीं नाहीं कोण जाणे ! परत जायला निघालास; पण घरापर्यंत तूं नीट पोंचशील अशीसुद्धां मला खात्री वाटेना ! वसंत, माझ्यापासून दूर जायची वेळ आली कीं तुझ्यांतला जिवंतपणा किती नाहींसा होतो, याची कल्पना तरी आहे तुला ?

**वसंत** : आणि असा निर्जीव झालेला मी, धंद्याच्या निमित्तानें दुसऱ्यांचे जीव जगविण्याचं नाटक करतों ! मला खरंच धास्ती वाटते, रोगाचं निदान तरी मी बरोबर करतों का ? रोग्याच्या नांवाऐवजीं अष्टौप्रहर कानांत घुमणारं तुझंच नांव नाहीं ना लिहीत ? त्यांच्या हृदयाऐवजीं माझ्या हृदयाचे ठोके नाहीं ना ऐकत ? माझं शरीर हें मानवी शरीर नसून एखादं तंतुवाद्य आहे कीं काय, असं मला वाटतं. त्याला चुकून कुणाचा स्पर्श झाला तर त्यांतून तुझ्याच नांवाचा झंकार उठेल ! उषा, तुला माझ्या यातना कळणार नाहींत ! का माझ्या आयुष्यांत आलीस ? माझं लग्न झाल्यावर, अशा भलत्या वेळीं कां आलीस ?

**उषा** : भलत्या वेळीं ? प्रेमाच्या राज्यांत भलती वेळ नसतेच. सगळ्याच घटिका मंगल, शुभदायक असतात ! माझ्या आयुष्यांत तूं पहिल्यांदां आलास. ती वेळ मला आठवते आहे. तापानं फणफणलेली मी, अंथरुणावर पडलें होतें; डॉक्टर म्हणून तुला बोलावून आणलं. तूं आलास, हात

धरलास, नाडी पाहिलीस, औषध तरी दिलं होतंस कीं नाहीं कोण जाणे ! दुसऱ्याच दिवशीं मी बरी झालें. एकदां तूं विचारलंस, तुझ्या नात्याचीं कोणी माणसं नाहींत का काळजी घ्यायला? माझ्या डोळ्यांत पाणी उभं राहिलं. वाटलं, तुला एकदम म्हणावं, तुम्ही आहांत कीं जन्मोजन्मींच्या नात्याचे. पण, नाहीं म्हटलं. खरोखरच जन्मोजन्मींचे ऋणानुबंध असावेत अशी तूं माझी काळजी घेतलीस. शुश्रुषासुद्धां केलीस, आणि आतां, दुःखानं करपलेल्या माझ्या जीवानं तुझ्या प्रेमाच्या वर्षावाखालीं पुरतं मूळ धरल्यावर तूं मला, कां माझ्या आयुष्यांत आलीस असा प्रश्न विचारतो आहेस ?

**वसंत** : काय करूं, उषा ? हा प्रश्न मी विचारीत नाहीं. माझं दैव मला तो प्रश्न विचारणं भाग पाडतं आहे ! प्रेमाचं सर्वस्व तुला अर्पण केलं असलं, तरी मी विवाहित आहें. किशोरीचा विचार....

**उषा** : आपल्या सुखदुःखाचे प्रश्न दुसऱ्याचा विचार करून सुट-तात का ? त्यांच्या सुखाचा प्रश्न त्या स्वतः सोडवूं शकल्या नाहींत; तूं कुठवर तो सोडवणार ? कसा सोडवणार ?

**वसंत** : तिच्याबद्दलचं माझं कर्तव्य पाळून.

**उषा** : कर्तव्यपालन करून नवरा बायकोला सुखी करूं शकतो का ? बायकांना नवऱ्याकडून प्रेमाची अपेक्षा असते; कर्तव्याची नाहीं. आजपर्यंत तूं कर्तव्य करतोच आहेस. झाल्या का त्या सुखी ? त्यापेक्षां आपलं लग्न झालं....

**वसंत** : ( स्वप्नाळूपणानें ) आपलं....लग्न....झालं....

**उषा** : तर त्या आतांपेक्षां दुःखी खास होणार नाहींत. म्हणूनच आज मी हा प्रश्न त्यांना सरळ विचारायला आलें आहें.

**वसंत** : पण काय विचारणार तूं तिला ?

**उषा** : ट्रिपहून परतलें आणि निश्चय केला कीं हें अनिश्चित जीवन यापुढं क्षणभरसुद्धां काढायचं नाहीं. त्यांच्याकडं जायचं. वेळ आली तर त्यांच्या पायांवर डोकंसुद्धां ठेवायचं. त्यांना म्हणायचं कीं तुमच्या मालकीच्या अंतःकरणाच्या एका कोपऱ्यांत मला जागा द्या. तेवढ्यांत मी राहीन. पण प्राणांवांचून शरीर जगविण्याचं हें दिव्य मला करायला लावूं नका.

**वसंत** : उषा, किशोरी तुझ्या विनंतीला होकार देईलहि. कुठल्याहि तऱ्हेनं प्रतिकार न करतांसुद्धां देईल.

**उषा** : देईल ना ? मग चल तर त्यांच्याकडे.

**वसंत** : पण....

**उषा** : आतां कसला रे पण? जिच्या सुखाचा विचार करायचा तिनं हो म्हटल्यावरसुद्धां पण आहेच का ?

**वसंत** : कोणत्या काळांत, कोणत्या समाजांत, आपण वावरतों आहोंत, तुला माहीत नाहीं का, उषा? सवतबंदीचा कायदा करून घेण्यापर्यंत बायकांची मजल गेली ! आणि आतां आपण लग्न करायचं ?

**उषा** : कायद्याची भाषा बोलणारांनीं खऱ्या प्रेमाच्या यातना कधीं अनुभवल्या तरी असतील का रे ? पण जाऊं दे. समाज दोष देईल तो मला. पण या समाजाचं मी कांहीं

लागत नाहीं. मला कुणाबद्दल कांहीं वाटत असेल तर तें अक्काबद्दल !

**वसंत** : हो ना ? मीसुद्धां तिलाच विचारून या बाबतींत कांहीं तरी करणार होतों. म्हणूनच मीं तुला दोनचार दिवस भेटूं नको असं म्हटलं होतं.

**उषा** : पुरे, पुरे. कालचा एक दिवस काढला; पुरे झालं. आतां जास्त दिवस काढणं अशक्य आहे. ही शिक्षा मला नको सांगूं रे, वसंत. आजच्या आज मी त्यांची संमति घेणार. चल, चल. चलना. (वळून) चल कीं रे.

**वसंत** : तूं जरा स्वस्थ बैस बरं. (उषा बसते) नाहीं तर आपण दोघं चहाबिहा घेऊं आणि मग पाहूं संमतीचं.

**उषा** : इथं ? मी करूं तुझ्याकरतां चहा ? करतें हं. मग आपण दोघंहि त्यांच्याकडे जाऊं.

( इतक्यांत घंटा ऐकूं येते. )

**उषा** : कोण असेल त्याला लवकर पाठव हं. नाहीं तर व्हिजिटची सबब सांगशील.

( पुनः घंटा. उषा आंत जाते. श्रीकांत येतो. )

**श्रीकांत** : वसंत, तूंच ? आपण मागं भेटलों होतों त्यापेक्षां किती तरी बदल झाला आहे रे तुझ्यांत ! आजारीबिजारी होतास कीं काय ?

**वसंत** : आजारी दिसतोंय मी ? छेः !

**श्रीकांत** : दिसतो आहेस तर खरा आजाऱ्यासारखा.

**वसंत** : दिसत असेन. आजारी नाहीं मी; झपाटलों गेलों आहें.

**श्रीकांत :** अस्सं ? पण मी मंत्रविद्या छान शिकलों आहें बघ. कसल्याहि प्रबळ पिशाच्चाची बाधा असेना कां, माझा गंडा बांधला कीं मनुष्य मुक्त झालाच पाहिजे.

**वसंत :** स्वत:ला बाधा होईपर्यंत प्रत्येक मनुष्य आपल्याला मांत्रिकच समजत असतो. कॉलेजच्या जगांत भोंवतालचे सगळे विद्यार्थी झपाटले जात होते, त्या वेळीं मीहि स्वत:ला मांत्रिकच समजत होतों.

**श्रीकांत :** आणि आतां त्या पिशाच्चवस्तींतून बाहेर पडून इतकीं वर्षं झाल्यावर तुला ती बाधा व्हावी अं ? दैवयोग ! दुसरं काय म्हणायचं ? मला खरोखरच तुझी दया येते, वसंत. पण आहे, माझा गंडा आहे.

**वसंत :** तुझा गंडा नाहीं; भ्रम आहे. तुला ती बाधा अजून झाली नाहीं म्हणून ही भाषा. लहानपणचीं दुखणीं लवकर बरीं होतात, तशीं कॉलेजांतल्या जीवनांतलीं पिशाच्चंहि लवकर सुटतात. पण आतां पत्तिशीच्या आसपास झपाटणारी ही बाधा ! तिच्या तडाख्यांतून मनुष्य जिवानिशीं सुटणं अशक्य आहे. श्रीकांत, कालपासून तूं इथं आला आहेस. तुला सगळं माहीत असणारच.

**श्रीकांत :** आहेच. पण तुला मात्र सगळं माहीत आहे असं वाटत नाहीं. माहीत असलं तरी सध्यां विसरला आहेस. तूं दुसऱ्या लग्नाचा विचार करतो आहेस ? तुझी वैयक्तिक जबाबदारी तूं विसरलेला दिसतोस. त्या मुलीवरहि कांहीं सामाजिक जबाबदाऱ्या आहेतच.

वसंत : तिच्यावर सामाजिक जबाबदाऱ्या? तिच्या आयुष्याची तुला माहिती नाहीं म्हणून. इतकं निष्प्रेम, रूक्ष, एकाकी जीवन आलं आहे तिच्या वांट्याला! दैवाच्या कोपानं, नव्हे आपल्यांतल्या सामाजिक अन्यायानं तिला आपल्या समाजांतून दूर रहावं लागलं. कां तिला समाजाची कदर वाटावी? इतक्या प्रेमळ मनाला इतकं कष्टमय जीवन काढायची वेळ यावी? श्रीकांत, तिच्या सहवासांत तूं आला नाहींस. कदाचित् माझ्यापेक्षांहि तूं झपाटला गेला असतास.

श्रीकांत: झपाटला गेलों असतों, तरी माझी केस अधिक सोपी होती. मी अविवाहित आहें. पण तूं....

वसंत : पण, माणसं झपाटलीं जातात तें त्यांना इष्ट-अनिष्ट कळत नाहीं म्हणून का?

श्रीकांत: वसंत....

वसंत : कशाला खटपट करतोस, श्रीकांत? माझ्या निश्चयापासून मी परावृत्त होणें शक्य नाहीं.

श्रीकांत: पण तुला परावृत्त करायला मी आलों आहें असं तुला सांगितलं कुणीं?

वसंत : सांगायला कशाला हवं? किशोरी तुझी बहीण आहे....मीं लग्न केलं तर तिला दुःख....

श्रीकांत: होईलच असं नाहीं बरं का! कालपासून मी तिला पाहतों आहें. चांगली मजेंत दिसते आहे ती. जेवते, खाते, हंसते, नटते. काल रात्रीं तर आम्ही असा कांहीं जल्लोष चालविला होता! हॉटेलांत गेलों, सिनेमाला गेलों. आपल्याला तर बुवा ती बिलकुल दुःखी दिसली नाहीं.

वसंत : ( दुखवल्यासारखा ) बायकांचा अभिमान आहे तो ! आपलं दु:ख कुणाला कळलेलं त्यांना आवडत नाहीं.

श्रीकांत: आणि आमची अक्का पहिल्यापासून पोक्त विचारसरणीची. ती खरंच वाईट वाटून घ्यायची नाहीं. उलट असा विचार करील कीं कांहीं बायकांचे नवरे मरत नाहींत का ? त्यांतलंच आपलंहि समजावं. समजावं कीं आपलाहि नवरा मेला !

वसंत : काय शहाणा आहेस ! मृत्यूची गोष्टच वेगळी आहे. त्या कांहीं कुणाच्या हातच्या गोष्टी नाहींत.

श्रीकांत: या तरी कुणाच्या—निदान तिच्या हातच्या गोष्टी आहेत का ?

वसंत : तिच्या हातच्या नाहींत आणि आतां त्या माझ्याहि हातच्या राहिल्या नाहींत. नाहीं तर तिच्या दु:खाला मी खचित कारण झालों नसतों.

श्रीकांत: अरे, पण नवऱ्यानं दुसरं लग्न केलं म्हणजे पहिली बायको दु:खी होतेच असं नाहीं बर का ! मला स्वत:ला अशा गोष्टी माहित आहेत, कीं नवऱ्याचं दुसरं लग्न झालं म्हणून पहिल्या बायकोनं समाधानाचा सुस्कारा सोडला, कीं बरं झालं हा सैतान दुसरीच्या मानगुटीवर बसला ! मला नक्की माहीत नाहीं म्हणा; पण न जाणो, तुझं दुसरं लग्न झालं या कल्पनेनं आमच्या अक्काला आनंदसुद्धां व्हायचा एकाद वेळीं !

वसंत : तूं कांहीं म्हण; पण मीं माझ्याकडून आतांपर्यंत तिला सुखीच करण्याचा प्रयत्न केला आहे.

श्रीकांत: आणि आतांपर्यंत तूं तिला सुखी केलंहि असशील. पण त्यामुळं यापुढं ती दु:खी होईल अशी कल्पना करणंहि

चूक आहे. एखाद्याला सुखी करायला सामर्थ्य लागतं, त्यापेक्षां दु:खी करायला जास्त सामर्थ्य लागतं. ज्या सहवासाचा आनंद अंत:करणाच्या खोल तळापर्यंत जाऊन पोंचला नाहीं, त्या सहवासांत त्या वेळेस सुख वाटत असेल; पण तो सहवास दुरावल्याचं दु:ख होईलच असं नाहीं. पण जाऊं दे. अक्काच्या सुखदु:खाचीं रडगाणीं गायला कांहीं मी इथं आलों नाहीं. मी जो इथं आलों आहें तो तुझा प्रिय मित्र म्हणून, (कॉलर सांवरून) समाजाचा एक प्रतिष्ठित घटक म्हणून. पहिली बायको जिवंत असतांना दुसरं लग्न करायला निघालेल्या कोणत्याहि मित्राला, 'तूं हें कशाकरतां करतो आहेस ?' एवढं विचारण्याचा अधिकार माझा आहे खास !

**वसंत** : ( उसनें अवसान आणून ) विचार, खुशाल विचार. पण मित्रालासुद्धां कांहीं प्रश्न विचारतां येत नाहींत. 'लग्न कां करतों' हा प्रश्न खाजगी आहे, अगदीं वैयक्तिक आहे.

**श्रीकांत**: अस्सं ! पहिल्या लग्नाच्या वेळचीं तुझीं सगळींच मतं आतां पालटलेलीं दिसताहेत ! त्या वेळेस आपलं लग्न म्हणजे एक सार्वजनिक प्रश्न वाटला तुला. त्या वेळेस तूं अभिनंदनाच्या तारा, सप्रेम आहेर, सगळ्यांचा स्वीकार केलास, बेंडबाजा लावून लग्न जाहीर केलंस, लोकांना निमंत्रणं देऊन त्यांना नारळ-पेढेसुद्धां वांटलेस. तें काय लग्न हा अत्यंत खाजगी प्रश्न आहे असा तुला भरंवसा वाटत होता म्हणून होय ? काय फसवतो आहेस स्वत:ला ! आतां तूं प्रेम हा खाजगी प्रश्न आहे म्हणशील, तर एकदम कबूल.

**वसंत** : म्हणजे प्रत्यक्ष तुझ्या बहिणीशीं संसार करीत असतांना दुसरीवर मीं प्रेम केलं तर त्याला तुझी हरकत नाहीं ?

**श्रीकांत**: बिलकुल नाहीं. कारण प्रेम ही खरोखरच वैयक्तिक भावना आहे. तिच्याबद्दल कुणीं कुणाला जबाब विचारणं हा मूर्खपणा आहे. पण तूं त्या वैयक्तिक भावनेला कायद्याचा आधार, धर्माची मान्यता व समाजाची प्रतिष्ठा सगळं मिळवून देण्याकरितां हें लग्नाचं सोंग उभं करीत आहेस. त्यांपैकीं एकहि गोष्ट खाजगी स्वरूपाची नाहीं. तेव्हां तुझ्या खासगी स्वरूपाच्या प्रश्नांत तुला त्याची जरूरच कां वाटते ? तूं प्रेम कर. अगदीं अनिर्बंध प्रेम कर. आणि खरा प्रेमी असशील तर धर्म, कायदा, समाज, सगळ्यांना गुंडाळून ठेवून आपल्या प्रेमाच्या सहचरीबरोबर सुखानं संसार कर.

**वसंत** : श्रीकांत, अशा रीतीनं तुझ्या बहिणीची वंचना करून....

**श्रीकांत**: वंचना कशाला ? तिला सांगून कर. आणि आतां तिला सांगायची जरूरीहि नाहीं. तिला माहीत आहे तुझं प्रेमप्रकरण. ती समजेल कीं तुझ्या प्रेमाचा प्रश्न तूं खाजगी रीतीनं सोडवतो आहेस. तीहि स्वतःचा प्रश्न.... ( थांबून ) करील बिचारी कुठंतरी नोकरीचाकरी.

**वसंत** : पण तिची आर्थिक जबाबदारी टाळायची माझी इच्छाच नाहीं.

**श्रीकांत**: मग प्रश्नच मिटला. पोटाचा प्रश्न तूं सोडवलास. आतां दुसरा प्रश्न उरला तिच्या मातृत्वाचा ! पण सोडवील, तो प्रश्न अक्काहि सोडवील खाजगी रीतीनं.

**वसंत** : श्रीकांत, स्वतःच्या बहिणीसंबंधीं ही भाषा तूं बोलतो आहेस !

**श्रीकांत**: माझ्या बहिणीसंबंधींच नव्हे; सगळ्या टाकलेल्या बायकां-संबंधीं. बायकोच्या पुत्रप्राप्तीची खाजगी कल्पनासुद्धां तुम्हां नवऱ्यांना असह्य होत आहे ! आणि तुम्ही मात्र....

**वसंत** : श्रीकांत, मैत्रीनं दिलेल्या सवलतीचा तूं वाजवीपेक्षां जास्त फायदा घेतो आहेस.

**श्रीकांत**: कबूल. पण हिंदु लग्नपद्धतीनं दिलेल्या सवलतीचा तूं फायदा घेतो आहेस त्यापेक्षां कमीच. आतांसुद्धां तुम्ही त्याच बुरसटलेल्या हिंदु लग्नपद्धतीचा फायदा घेणार असाल; नाहीं रे? एक साक्षीदार भटजी, दुसरा अग्नि ! भटजीची जीभ भरपूर दक्षिणा देऊन बंद करतां येते आणि अग्नीला तर म्हणे सात जिभा आहेत ! पण त्यांतल्या एका तरी जिभेनं दुसऱ्या लग्नाची चुगली केली आहे का? हो. बाकी तोहि दोन बायकांचाच नवरा ! तुम्हांला तोच साक्षीदार भेटायचा.

**वसंत** : (या सरबत्तीपुढें हताश होऊन कांहीं तरी बोलण्याचा निष्फल प्रयत्न करीत ) नाहीं. पण, श्रीकांत...

**श्रीकांत**: (तें जाणून ) अरे, जाऊं दे. वसंत, युक्तिवादानं तुला निरुत्तर करण्याकरितां कांहीं मी इथं आलों नाहीं. तुझीं कारणं समजावून घेण्याकरतां, सुखाचा मार्ग शोधतां शोधतां भावनाविवशतेमुळं एखाद्या खड्डयांत आंधळेपणानं पडणार असशील, तर तुला सावध करण्याकरतां आलों आहें.

**वसंत** : ( पुनः जोरांत ) आंधळेपणानं एक लग्न करून खड्डयांत पडलों; आतां पुनः पडणं शक्य नाहीं.

**श्रीकांत:** असं ? कां ? तुझा हा प्रीतिविवाह आहे म्हणून होय ?

**वसंत :** केव्हांहि.

**श्रीकांत:** काय भ्रम आहे ! अरे, प्रीतिविवाहाचे फांसे हातांत धरले म्हणजे सुखाचं हमखास दान पडतं असं का तुझं कोष्टक आहे ?

**वसंत :** माझ्या भावनांची साक्ष हें माझं कोष्टक. दुसरीं कोष्टकं नको आहेत मला.

**श्रीकांत:** आपल्या भावी सुखाचा तुला फार भरंवसा दिसतो आहे बुवा ! सगळ्या जुगारी डावांचं हेंच वैशिष्ट्य असतं बघ. तिकिट घेतांना माणसाला अगदीं भरंवसा वाटतो कीं हें बक्षिस आपण जिंकणार ! लग्नाइतका दुसरा जुगारी डाव नाहीं. आणि त्यांतल्या त्यांत प्रीतिविवाह म्हणजे सर्वस्व पणाला लावून टाकलेला फांसा ! जिंकलास तर ठीक; नाहीं तर सर्वस्वाचा नाश ! प्रीतिविवाहांत तडजोडीला जागाच नसते. म्हणून म्हणतों, विचार करून डाव टाक. एका लग्नाच्या जुगारांत हरलासच आहेस.

**वसंत :** श्रीकांत, मला माहित आहे तें. लग्नाचा जुगार मनुष्य दैवाशीं खेळतो. जिंकलं तर सुख; नाहीं तर दुःख. पण प्रेमाचा जुगार मनुष्य स्वतःच्या प्राणांशीं खेळतो. जिंकला तर जगला; हरला तर दुनियेंतून गेला !

**श्रीकांत:** हो. पण तुझा प्रश्न नुसता प्रेमाचाच नाहीं. लग्नाचा आहे. प्रेमांत कदाचित् जिंकलं असशील, आणि तरीसुद्धां लग्नांत हरशील.

**वसंत :** या गोष्टीचा विचार आम्हीं केला नाहीं अशी तुझी कल्पना आहे ? त्यांत हरणं अशक्य आहे.

**श्रीकांत:** तुला. पण तिच्या आयुष्यांतला हा पहिलाच फांसा. पुरुष काय एकदां हरला, दुसरा डाव. पण बायकांचं तसं होत नाहीं. लग्नाची घटना म्हणजे त्यांच्या सर्वस्वाचा होम. त्यांतून ती बिचारी अननुभवी; तुझ्यासारखी सरावलेली नाहीं. आपण कोणत्या आगींत उडी टाकतों आहोंत, त्याची तिला पूर्ण कल्पनाहि आली नसेल.

**वसंत** : ( हंसून ) श्रीकांत, आतां तुला तुझ्या बहिणीपेक्षांहि माझ्या भावी पत्नीचीच जास्त काळजी पडलेली दिसते आहे!

**श्रीकांत:** मी तर बोलून चालून विश्वकुटुंबी. ही आपली सख्खी बहीण; ही चुलत बहीण; ही बहीणच नाहीं, तेव्हां तिच्या भानगडींत पडायचं आपल्याला कारणच नाहीं, असल्या वृत्तीचा मीं पूर्वीच निरोप नाहीं का घेतला? माझ्या दृष्टीनं जशी अक्का, तशीच तुझी प्रणयिनी. स्त्रीला मी स्त्रीजात म्हणून ओळखीतच नाहीं. एक ईश्वरी शक्ति म्हणून ओळखतों. निर्मिति आणि संरक्षण हें या शक्तीचं जगांतलं कार्य. तें विसरून ही शक्ति जर संहाराच्या, दुसऱ्याचे संसार उध्वस्त करण्याच्या कार्याला लागली, तर जगाच्या प्रगतीच्या मार्गांत तिनं मोठाच अडथळा आणला असं म्हणावं लागेल! वसंत, आपल्या पत्नीचा संसार, तिचं विश्व उध्वस्त करण्याच्या या कार्यांत आपल्या प्रणयिनीला मदत करण्याचा तुझा संकल्प दिसतो आहे.

**वसंत** : माझा काय संकल्प आहे, हा इथं प्रश्नच नाहीं; हा संकल्प तिचा स्वतःचा आहे. मी तिला लग्नाला प्रवृत्त केलं अशी तुझी कल्पना असेल तर ती चूक आहे.

**श्रीकांत:** मग तिनं तुला लग्नाला प्रवृत्त केलं ? तिच्या आग्रहास्तव तू लग्नाला तयार झालास ? अरे, लग्न करायचं तें स्वतःच्या प्रेमाकरतां तरी करायचंस. ती प्रेमी आहे, लग्न करायला मोकळी आहे. पण तूं पहिल्या लग्नांत 'नातिचरामि' अशी शपथ घेतली आहेस ना ?

**वसंत** : हें सगळं मीं तिला पटवलं नाहीं, माझ्यावर प्रेम करण्यापासून तिला परावृत्त करण्याचा प्रयत्न केला नाहीं अशी का तुझी कल्पना आहे ?

**श्रीकांत:** केला असशील; पण शब्दांनीं, कृतीनं नव्हे. दुसरं मनुष्य आपल्यावर अट्टाहासानं नितांत प्रेम करतं, त्या वेळेस आपल्यांतल्या अहंपणाच्या ज्वालेंत किती तेल ओतलं जात असतं त्याची तुला कल्पना तरी आहे ? अहंपणाच्या त्या ज्वालेची तूं जोपासना केलीस, ती तिच्यावरच्या प्रेमानं नव्हे; स्वतःवरच्या प्रेमानं. आणि आतां त्याची सगळी जबाबदारी तिच्यावर टाकतो आहेस. गरीब बिचारी !

( उषा हातांत चहाचा ट्रे घेऊन येते व दरवाजांतच थबकते. )

**वसंत** : बिचारी ! श्रीकांत, म्यानाबाहेर पडलेल्या तरवारीला तूं बिचारी म्हणशील ? प्रचंड मेघगर्जनेला मागं सारून निमिषमात्रांत डोळ्यांना चकित करणारी, मोहविणारी विद्युल्लता कधीं बिचारी असते ? त्या झंझावातांत उषेच्या जागीं एखादी नाजुक वेल असती तर खचली असती. पण उषा....

**श्रीकांत:** ( हताशपणें ) खरं आहे, तूं मघांशीं म्हणालास तें. तूं पुरता पछाडला गेला आहेस. वसंत, कॉलेजच्या जगांतल्या शंखिनी-डंखिनी षोडशवर्षीय अप्सरांचीं रूपं घेऊन येंत होत्या. त्यांना तूं दाद दिली नाहींस.

तुझी प्रणयिनी षोडशवर्षीय अप्सरा खास नसणार. अशा या मानवरूपी पिशाच्चबाधेनं इतका झपाटलास? पाहिलीच पाहिजे मला ही बाधा.

( उषा एकदम पुढें येऊन )

उषा : चहा घेणार ना रे ? ( दोघेहि चपापतात. )

वसंत : हा माझा मित्र नुकताच आला आहे गांवाहून.

उषा : कॉलेजपासून खूप मैत्री दिसते आहे तुमची. कॉलेज-मधल्या तुझ्या बहादुरीचं वर्णन करीत होते! यांना नाहीं वाटतं अजून एखाद्या शंखिनी-डंखिनीनं पछाडलं ?

वसंत : अजून तरी नाहीं. आणि हे विश्वकुटुंबी असल्यामुळं तसा संभवहि नाहीं.( ओळख करून देण्याच्या उद्देशानें ) श्रीकांत, आलीच असेल तुला कल्पना. ही उषा,...पाटणकर.

उषा : म्यानाबाहेर पडलेली तलवार.

श्रीकांत: नमस्ते! आतां तुमच्यासंबंधींच आम्ही बोलत होतों.

उषा : ऐकलं. आणि हे पिशाच्चबाधेनं झपाटले आहेत हें तुमचं मतहि ऐकलं.

श्रीकांत: कुठलंहि वैयक्तिक सामाजिक बंधन झुगारून देण्यापर्यंत जेव्हां माणसाची मजल जाते, तेव्हां त्याला झपाटण्याचीच उपमा योग्य ठरते. उषाताई, तुम्हींसुद्धां या बंधनांचा विचार करायला हवा.

उषा : सामाजिक बंधनांचा विचार मी करूं? आज अस्तित्वांत नसलेलीं, उद्यां करकचून बांधणारीं, असलीं हीं हिंदु-स्थानांतील लहरी सामाजिक बंधनें !

श्रीकांत: पण आपण हिंदुस्थानांतच वाढलां असाल.

**उषा** : मुळींच नाहीं. मी ज्या समाजांत वाढलें, शिकलें, त्याला असलीं बंधनं पाळायचीं मुळींच जरूर वाटली नाहीं.

**श्रीकांत:** म्हणजे ? बंधनांवांचूनच्या एखाद्या समाजांत तुम्ही वाढलां कीं काय ?

**उषा** : बंधनांवांचून समाज असतात कीं नाहीं कोण जाणे ! मी ज्या समाजांत वाढलें त्यांत बंधनं आहेत; पण तिथं बायकांचा इथल्यासारखा छळ नाहीं होत.

**श्रीकांत:** बायकांचा छळ होत नाहीं असा देश ! (हळूच वसंताला) कोणता रे देश हा ?

**उषा** : त्यांना कशाला ? मला विचारा की. ब्रह्मदेश.

**श्रीकांत:** ब्रह्मदेश ?—अस्सं—मग इकडे....

**उषा** : आलें तुमच्या मित्रांना पछाडायला-जपानच्या हल्ल्यानंतर....

**श्रीकांत:** पण मराठी छान बोलतां की !

**वसंत** : अरे, तीच तिची मातृभाषा आहे.

**श्रीकांत:** असं. आईवडील वगैरे मंडळी आपल्याबरोबर आली नाहींत वाटतं ?—हा म्हणत होता कीं आपण अगदीं एकट्या आहांत. आईवडील तिकडेच राहिले वाटतं ?

**उषा** : नाहीं. जगांतच नाहींत ते.

**श्रीकांत:** अरेरे ! क्षमा करा हं. मला कल्पना नव्हती. इकडेहि नाहींत कुणी नात्याचीं ?

**उषा** : कुणाला माहीत !

**श्रीकांत:** चौकशी करूं कीं आपण.

**उषा** : पण हवी कशाला चौकशी ? आईचे सगळे नातेवाईक तिकडे होते; अन् ते सगळे गेले.

**श्रीकांत:** अस्सं ! म्हणजे ब्रह्मदेशांत आपण आजोळीं होतां. काय आडनांव बरं त्या कुटुंबाचं ? माझ्याहि माहितीचं एक कुटुंब ब्रह्मदेशांत होतं—पाटणकर नांवाचं.

**उषा** : कोण पाटणकर ?

**श्रीकांत:** विश्वनाथ गोपाळ पाटणकर.

**उषा** : ते माझे मामा लागतात.

**श्रीकांत:** आणि त्यांना एक बहीण होती ती ?

**उषा** : तीच माझी आई.

**श्रीकांत:** ( चमकून ) काय ? ती शारदाबाई जोशी—तुमची आई ? मग तुमचं आडनांव पाटणकर कसं ?

**उषा** : आईनं मला तेंच लावायला सांगितलं. जोशी नांव नको म्हणाली.

**श्रीकांत:** तें कां ?

**उषा** : टाकलेल्या बायकोनं नवऱ्याचं नांव तरी कां लावावं ? तिनं तर कुंकूसुद्धां पुसलं होतं !

**श्रीकांत:** पण तुम्हीं वडिलांचं नांव लावायला काय हरकत ? आईला टाकलेली असली तरी मुलाला बापाचं प्रेम वाटणारच.

**उषा** : मला त्यांचं प्रेम कसं वाटणार ? मीं तर त्यांना कधीं पाहिलंहि नाहीं. आणि त्यांना तर माझं अस्तित्वसुद्धा माहीत नाहीं.

**श्रीकांत:** (आश्चर्यानें) असं कसं होईल ? आपलं अस्तित्व त्यांना माहीत असणारच.

**उषा** : संभवच नाहीं त्यांना माहीत असण्याचा. त्यांनीं दुसरं लग्न केलं म्हणून आई रागावून ब्रह्मदेशांत मामांच्याकडे गेली. त्यानंतर तिकडंच सहासात महिन्यांनीं माझा जन्म झाला. आपल्याला एक मुलगी आहे, हेंच वडिलांना माहीत नाहीं. बाकी ते तरी स्वत: जिवंत आहेत कीं नाहींत कोण जाणे!

**श्रीकांत:** आहेत....

**उषा** : (आश्चर्यानें) आहेत? –कुठं? पण मला कशाला ह्या चौकशा? मला त्याची जरूर नाहीं. ज्यांनीं माझ्या आईच्या आयुष्याचं मातेरं केलं त्यांचं तोंडसुद्धां पाहण्याची माझी इच्छा नाहीं.

**श्रीकांत:** अरेरे! उषाताई, ज्यांनीं तुमच्या आईच्या आयुष्याचं मातेरं केलं त्यांच्याच मुलीच्या संसाराचं मातेरं तुम्ही करीत आहांत!

**उषा** : म्हणजे? काय म्हणतां तुम्ही हें? वसंताचे सासरे माझे वडील?

**वसंत** : श्रीकांत, काय! सांगतोस काय तूं हें?

**श्रीकांत:** या विधिघटनेनं मलासुद्धां थक्क केलं आहे!

( झटकन पडदा पडतो. )

## अंक तिसरा

(उषेचें घर. एका कोपऱ्यांत रेडिओ, दुसऱ्या कोपऱ्यांत पडद्यापलिकडे उषेचा पलंग दिसतो आहे. डाव्या हाताच्या भिंतीशीं एक ड्रेसिंग टेबल, उजवीकडील भिंतीला टेकून असलेल्या स्टँडवर एक बुद्धाचा पुतळा, इतर खुर्च्या, टेबल, वगैरे फर्निचर. पडदा उघडते वेळीं रेडिओवर एक गाणें चाललेलें आहे. उषा व चैतन्य ऐकत आहेत. पण उषेचें तिकडे लक्ष नाहीं. ती एकदम म्हणते)

**उषा** : पुरे आतां हें गाणं.

**चैतन्य:** (आश्चर्यानें) बेटी, गाणां बी नाहीं ऐकती तूं आज ?

**उषा** : आज तर मला कांहींच नको असं वाटतं.

**चैतन्य:** असा ? थांब, तो तुझा आवडता भावगीत लावतो.

(चैतन्य एक रेकॉर्ड लावतो. पण त्याचा परिणाम अगदीं उलटा होतो. उषा तें ऐकतां ऐकतां अगदीं अस्वस्थ होत जाते आणि गाणें अगदीं संपतां संपतां तो भावनोद्रेक जणुं काय एकदम असह्य होऊन म्हणते)

**उषा** : पुरे, बाबा.

**चैतन्य:** (आश्चर्यानें) आं ! हा तुझा आवडता गाणा बी नको तुला आज ? संगीत तर तुला आवडतो, बेटी.

**उषा** : (अर्धवट स्वतःशीं) काय असतं संगीत म्हणजे तरी ? वेगवेगळ्या स्वरांची गोड गुंफण. ती गुंफण जर बरोबर

झाली नाहीं तर संगीत निर्माण होणारच नाहीं. माणसांचीं आयुष्यं तशींच नाहींत का ? वेगवेगळ्या भावनांची गोड गुंफण होऊं शकली तर जीवनांत संगीताची गोडी निर्माण होते; नाहीं तर माझ्यासारखं विस्कळित, चमत्कारिक आयुष्य वांट्याला येतं.

**चैतन्य:** तुझ्या जिवाला इतका कसला कष्ट झाला, बेटी ? तो तूं जरा धीर धर. परमेश्वरला तो तुझा पण चिंता असतो.

**उषा :** नाहीं हो, बाबा !

( एकदम रडूं लागते. )

**चैतन्य:** ( तिच्याजवळ जाऊन ) तुला काय होतो तो मला माहीत आहे. लग्नाची चिंता करतो. कालपासून तो जास्त करतो. ( हंसून ) पण बेटी, मी आतां तुझा लग्न लवकर करतो, तुझा डॉक्टरबरोबरच करतो.

**उषा :** ( डोळे पुसून ) इतकं सोपं नाहीं तें, बाबा !

**चैतन्य:** अरे, तो अवघड असायला काय झाला ? मी तो तुझ्या डॉक्टरला पण सांगितला कीं लग्न करून घे. आतां त्याचा सासरा येतो, त्याला पण तूं सांगून दे कीं मी डॉक्टरशीच लग्न करतो.

**उषा :** ( विचारमग्न ) वसंताच्या सासऱ्यांना भेटायचं–त्यांना सांगायचं कीं मी वसंताशीं लग्न करणार ? कशी भेटूं ? काय वाटेल त्यांना मला पाहून ?

**चैतन्य:** काय वाटतो तो वाटतो. पण त्याला तूं आजच सांगतो तर बरा होतो. तो त्याच्या पोरीची काळजी करतो तो मी तुझी काळजी करतो.

उषा : त्यांच्या मुलीची काळजी ? त्यांची मुलगी ? ( विनवणी करीत ) बाबा, आज मी त्यांना नाहीं भेटलें तर नाहीं कां चालणार ?

चैतन्यः कसा चालतो ? मीं तो हे आजचे Appointment ठरवले. बेटी, तूं आज त्याला भेटतो, सांगतो का हा लग्न मी करतो तो फार चांगला होतो. मी तो त्याच्याकडेच आतां चालले. ते थोड्या वेळांत येतेच तुला भेटायला.

( घंटा वाजते. )

उषा : या. (श्रीकांत येतो. त्याच्या हातांत वर्तमानपत्रांत गुंडाळलेली एक वस्तु आहे. ) या बसा ना ! ( श्रीकांत आळीपाळीनें उषा व चैतन्याकडे पाहतो. तें ओळखून ) हे श्रीकांत, एक मोठे Social Worker आहेत–हे चैतन्यदेव. यांच्याच सोबतीनं मी हिंदुस्थानांत आलें.

( श्रीकांत आणि चैतन्य नमस्कार करतात. )

चैतन्य : अच्छा, बेटो, आम्ही थोड्या वेळानी येईल. (जायला निघतो.)

श्रीकांतः अरे, मी ( जायला निघतो ) तुमच्या कांहीं कामाच्या वेळीं आलों का ? कांहीं बोलणं चाललं होतं ? चालूं द्या; मी थोड्या वेळानं येईन.

उषा : नाहीं, पुनः ते त्यांना बोलवायला जाताहेत. जा तुम्ही, बाबा. ( चैतन्य जातो ) आज ते मला भेटायला येणार आहेत ना ?

श्रीकांतः ( गोंधळून ) मी नाहीं समजलों. कोण भेटायला येणार आहेत ?

उषा : तुमचे काका-काकू नाहीं का येणार आज ? मला वाटलं तुम्ही त्यांचाच निरोप घेऊन पुढं आलांत !

**श्रीकांत:** ( अत्यंत आश्चर्यानें ) म्हणजे ? काका-काकू आणि आतां इथं येणार आहेत ?

**उषा :** तुम्हांला नाहीं माहीत ?

**श्रीकांत:** खरंच नाहीं. माझ्या पश्चात् केव्हांतरी त्यांनीं हा बेत ठरवलेला दिसतोय् !

**उषा :** मला वाटलं, तुम्हीं काल त्यांना माझ्या नात्याची गोष्ट सांगितलीत म्हणूनच त्यांनीं आज मला भेटायचा बेत केला.

**श्रीकांत:** पण तुमचं त्यांचं नातं मीं त्यांना अजूनहि सांगितलेलं नाहीं.

**उषा :** ( आश्चर्यानें ) खरं ? असं कसं होईल ?

**श्रीकांत:** उषाताई, तुमच्या आणि काकांच्या नात्याची बातमी ही काय एखादी क्षुल्लक वर्तमानपत्री बातमी आहे का, कीं स्वतःला कळल्याबरोबर मीं धांवत जाऊन इतरांनाहि सांगावी ? तरुणपणीं उतावीळपणानं चूक केल्यामुळं काकांना आतां किती चमत्कारिक प्रसंगाला तोंड द्यावं लागणार आहे ! अक्काची सवत होऊं पाहणारी मुलगी कोण आहे ह्याची बिचाऱ्यांना कल्पनाहि नाहीं; आणि तुमच्या मनांत तर वडिलांबद्दल इतका कडवटपणा निर्माण झालेला ! —अशा परिस्थितींत तुम्हांला कांहीं सांगून, त्यांच्या मनाची थोडी तयारी करून मग एकदोन दिवसांनीं ही गोष्ट त्यांना सांगायचं मीं ठरवलं होतं, आणि इथं एकदम ऐकतों कीं ते थोड्याच वेळांत येणार आहेत !

**उषा :** चैतन्यांच्या जवळ मीं त्यांना आज भेटण्याचं कबूल केलं. पण मलासुद्धां तसं थोडं चमत्कारिक वाटतंय.

**श्रीकांत:** नुसतं चमत्कारिक नव्हे, कांहीं तरी जास्त ! तुम्ही माझ्या शारदाकाकूची मुलगी हें कळल्यावर माझ्या मनावर इतका विलक्षण परिणाम झाला कीं घरीं गेल्यावर मी कुणाशीं धड बोललोंसुद्धां नाहीं ! त्या अघटित घटनेनं वर्तमान-कालाचा पडदा एकदम दुभंगून २७ वर्षांपूर्वीच्या त्या भूत-कालांत मला नेऊन सोडलं. कालपासून माझ्या आणि शारदाकाकूच्या त्याच जीवनाचा चित्रपट मी पाहतों आहें. मी सातआठच वर्षांचा असेन; शारदाकाकू संध्याकाळीं देवाला नीरांजन लावायची. मला पर्वचा शिकवायची, गोष्टी सांगायची, आजीला चोरून माझ्याशीं पत्तेसुद्धां खेळायची ! काकांना आणि आजीला ती आवडत नसल्यामुळं कीं काय कोण जाणे, पण त्या एकत्र कुटुंबांत तिचा खरा सौंगडी मीच होतों. ती एकदां माहेरीं गेली ती परत आलीच नाहीं. त्याचं कारण मला कळलं नाहीं; पण ती गेल्यावर कितीतरी दिवस मला एकलकोंडं वाटत होतं. तिची आठवण येई. वाटे कीं शारदाकाकूनं परत यावं, आप-ल्याशीं पत्ते खेळावे; पण तें कधींच झालं नाहीं ! एक दिवस इंदिराकाकू घरीं आली ! उषा, काल तुला पाहिलं मात्र अन् वाटलं कीं शारदाकाकूच परत आली ! काय विलक्षण साम्य ! क्षमा करा हं ?

**उषा** : कां ! क्षमा कसली ?

**श्रीकांत:** चुकून तुमच्या नांवाचा एकेरी उल्लेख केला—'उषा' म्हटलं.

**उषा** : त्यांत काय ? वडील भावाचा तो हक्कच आहे.

**श्रीकांत:** असं मलाहि वाटतं–काल घरीं गेल्यावर तर शारदाकाकूच्या आठवणीनं मी इतका बेचैन झालों होतों! तिला पुन: पहावंसं वाटलं. म्हणून घरांतले सगळे जुने फोटो धुंडाळले. त्यांत माझ्या मुंजींतला हा ग्रुप फोटो सांपडला. शारदाकाकूचा तो शेवटचाच फोटो. पहा ना.

( उषा फोटो पहाते. )

**उषा :** पण हा अगदीं शेवटचा नाहीं. मी एक वर्षांची असतांना घेतलेला तिचा एक फोटो माझ्याजवळ आहे. आणतें हं.

(आंत जाऊन फोटो आणते. दोघेंहि तो फोटो जवळ धरून पहातात.)

**श्रीकांत:** अगदीं तेंच रूप—तोच वेष. सरळ भांग. मोठ्या कांठाच्या खणाची चोळी. कपाळाला चंद्रकोर, अगदीं एक नमुना. ( उषेकडे वळून ) उषाताई, तुम्ही आईसारखा असा पोशाख केलात तर हुबेहूब आईसारख्या दिसाल !

**उषा :** खरं? ( पण उषाचें लक्ष फोटोकडेच आहे. तो पाहतां पाहतां ती एकदम रागावून ) आणि हे तुमचे काका वाटतं?

**श्रीकांत:** हो, माझे काका, आणि तुमचे जन्मदाते वडील !

**उषा :** वडील ?

**श्रीकांत:** कां तुम्ही त्यांच्याबद्दल एवढी आढी बाळगतां? काकाकाकू, खरंच तीं तशीं चांगलीं माणसं आहेत.

**उषा :** ( उपरोधपूर्ण ) हं ?

**श्रीकांत:** एकाद्या चुकीमुळं मनुष्य कांहीं एकदम सैतान ठरतो असं नाहीं.

**उषा :** एखादी चूक? असली कसली एखाद्याचा जीव घेणारी चूक?

**श्रीकांत:** उषाताई, तो पंचवीस वर्षांपूर्वीचा काळ होता. त्या वेळेस काकांना कदाचित् ती चूकसुद्धां वाटली नसेल. अजूनसुद्धां लग्नाच्या बाबतींत असल्या चुका करणं हा आम्हांला जन्म-सिद्ध हक्क वाटतो.

**उषा :** आणि संधी सांपडली तर तुम्हाला त्याबद्दल प्रायश्चित्त देणं हा आम्हालाहि आतां हक्क वाटूं लागला आहे. तुमच्या काकांना म्हणावं पंचवीस वर्षांपूर्वी चूक केलीत आणि सहीसलामत सुटलांत; आतां भोगा त्याचं प्रायश्चित्त.

( हातांतला फोटो फेकते. )

**श्रीकांत:** च्-च्-च् अ-हं-हं. उषाताई, इतका कडवटपणा स्त्रीजातीला शोभत नाहीं. आणि हें प्रायश्चित्त तुम्ही कुणाला देतां आहांत त्याचा तरी विचार करा. चूक काकांची—एका पुरुषाची! त्याचं शासन एका निरपराध स्त्रीला, आणि तेंहि दुसऱ्या स्त्रीकडूनच! खासा न्याय!

**उषा :** आणि तुमच्या काकांचा न्याय?

**श्रीकांत:** काकांचा न्याय नव्हेच; अन्याय! त्यांनीं चूकच केली; पण ते पुरुष आहेत. पुरुषांच्या आणि स्त्रियांच्या अंत:करणाचे धर्मच वेगळे आहेत. संस्कारसुद्धां वेगळे आहेत. आम्हां पुरुषांचीं अंत:करणं, दुसऱ्याच्या मनाचा विचारसुद्धां न करतां सुखाचा थेंब थेंब शोषून घेण्याकरतां हपापलेलीं; तर तुम्हां बायकांचीं अंत:करणं पाण्यानं कांठोकांठ भरलेल्या नील मेघांसारखीं, प्रेमजलाचा दुसऱ्यावर वर्षाव करून त्याचं जीवन फुलवण्याकरतां आसावलेलीं. उषाताई, काकांच्या चुकीचं प्रायश्चित्त तुम्ही त्यांना खरंच देऊं

नका, काकांनीं शारदाकाकूच्या बाबतींत अन्याय केला असला तरी देऊं नका; कारण तुम्हां बायकांचा धर्म सूड घेण्याचा नाहींच; प्रेम करण्याचा आहे.

**उषा** : पण कुणीं ठरवले हे धर्म? तुम्हीं तुमच्या सोयीकरतां ठरवलेत. पण या स्तुतीला भाळण्याचे दिवस आतां गेले. आमचा धर्म तुम्हीं नका ठरवूं! वाटलं तर आम्हीं प्रेम करूं; पण योग्य वाटलं तर सूडहि घेऊं.....

**श्रीकांत**: पण तो तुमचा खरा स्वभाव नव्हे! तुमचा खरा स्वभाव प्रेमाचा. कुणीं सभेंत ठराव पास करून नाहीं हें ठरवलं; हें निसर्गातलं सत्य आहे. तुम्ही प्रेम करतां; त्या प्रेमामुळं आमचं जीवन सुखी होतं. पण त्याची खरी किंमत आम्हांला न कळून आम्ही त्या प्रेमाचेसुद्धां सट्टे खेळतों.

**उषा** : मग हें सारं तुम्ही तुमच्या काकांना सांगाना! तुम्हीं आमच्या प्रेमाचेसुद्धां सट्टे करायचे आणि संधी सांपडली तर त्याबद्दल सूड घ्यायचासुद्धां आम्हांला चोरी! ती काय म्हणून?

**श्रीकांत**: आम्ही सट्टे करतों म्हणूनच, उषाताई, आम्हांला तुमचीं अंतःकरणं कळत नाहींत! तीं समजून घेणं अगत्याचं आहे, आवश्यक आहे, असंसुद्धां कधीं वाटत नाहीं; म्हणून तर आमच्या हातून हे अन्याय होतात! अशा परिस्थितींत तुम्हीं बायकांनीं तरी एकमेकींचीं अंतःकरणं समजून वागायला पाहिजे. तें करण्याऐवजीं, तुम्हीं जर एकमेकींच्या संसारावर उठलांत तर स्त्रियांच्या जबाबदारीला तुम्ही जागलां नाहींत असं ठरेल.

उषा : पण पुरुषांच्या जबाबदारीला तुम्ही तरी कुठं जागतां?

श्रीकांत: म्हणूनच तर तुमच्यावर दुप्पट जबाबदारी आहे. आम्ही आमच्या जबाबदारीला जागलों असतों, तर तुम्ही बायका या दुर्दशेला खासच आलां नसतां.

उषा : होय ना? मग स्वतःची जबाबदारी विसरलेल्यांना जर आम्हीं शिक्षा दिली तर त्यांत चूक कुठं झाली? अपराध्यालासुद्धां शासन न देण्याचं, अन्यायाचासुद्धां मोबदला न देण्याचं हें सोवळं तत्त्वज्ञान, आम्हां बायकांच्याच मागं कां?

श्रीकांत: कारण तुम्हांला आई व्हायचं असतं. निर्मिति करायची, त्याच्या संरक्षणाकरतां घरटं बांधायचं, त्यांच्या चोंचींत चारा घालून त्यांना वाढवायचं, त्यांच्या सुखाकरतां धडपडायचं, हा तुमचा धर्म. आम्हीं निर्माण केलेली संस्कृति त्या तुमच्या अपत्यांचा, निदान त्यांच्या सुखाचा तरी संहार करीलच; तें टाळायचं असेल तर तुम्हांला आमच्या पावलांवर पावलं टाकून भागायचंच नाहीं. आमचं अनुकरण न करतां, आपल्या अपत्यांच्या सुखाकरतां तुम्हांला प्रगतीचे वेगळे मार्ग शोधायला हवेत. त्या मार्गांवर पाऊल टाकणारा नवा समाज निर्माण करायला हवा....

उषा : कित्ती चांगलं बोलतां तुम्ही! पण बराच वेळ झाला नाहीं चैतन्यांना जाऊन? आतां तुमचे काका-काकू येण्याची वेळ झालीच. ( फोटो उचलते आणि त्याकडे लक्षपूर्वक पहात ) थांबा ना तुम्ही ती मंडळी येईपर्यंत.

**श्रीकांत:** हो, थांबलंच पाहिजे मला. एकीकडे तुम्ही; एकीकडे आमचे काका. तेव्हां आतां तर दोघांच्याहि दृष्टीनं मला थांबणंच योग्य आहे.

**उषा :** बसा हं. तोंपर्यंत मी आंतून कपडे बदलून येतें. (जायला निघते; पण पुनः मागें वळून) माझं मन वळवायचा म्हणे तीं दोघं प्रयत्न करणार आहेत! पहा तर खरा कसा मजा येईल तो.

(उपरोधिक हंसून पुनः जायला निघते.)

**श्रीकांत:** (मोठ्यानें) उषाताई, उषाताई, वात्सल्य-भावनेनं व्याकुळ होऊन एका परक्या पोरीला शरण आलेल्या आईबापांचं तें मन आहे, एवढी तरी आठवण........

**उषा :** (त्याच्याकडे दुर्लक्ष करून जातां जातां) ती मंडळी आली म्हणजे मला हांक मारा. (जाते.)

**श्रीकांत:** (थोडा वेळ अगदीं हतबुद्ध होतो. अखेर स्वतःशींच) हं श्रीकांत-राव, व्हा आतां "आलीया भोगासी सादर !"

(तो मटकन् खालीं बसतो. इतक्यांत हळुच दरवाजा उघडून बेबी येते.)

**बेबी :** वा, दादासाहेब!

**श्रीकांत:** ऑं, बेबी! अन् तूं कशी आलीस इथं?

**बेबी :** कशी? जसा तूं तशीच! मला न कळत तुम्हीं सर्वांनीं इथं यायचा बेत केलात! मला कळलं-—म्हणून आलें परस्पर कॉलेजमधून. पण त्या कुठं आहेत?

**श्रीकांत:** आंत.

**बेबी :** अन् तूं तर इथं अगदीं घरच्यासारखा बसला आहेस की!

**श्रीकांत:** (विचारांतच) हें लोकांचं घर आहे, नाहीं का? पण खरं सांगूं? अलिकडे आपलं, लोकांचं घर, हॉटेल, तुरुंग, यांतला फरकच माझ्या ध्यानांत राहीनासा झाला आहे बघ. पण तें जाऊं दे. बेबी, तू आलीस ती काकांना न विचारतां आलीस; चांगलं नाहीं हें!

**बेबी** : पण विचारलं असतं तर बाबांनीं मुळींच परवानगी दिली नसती. म्हणून आलें परस्पर कॉलेजांतून.

**श्रीकांत:** मग आतां माझं ऐक. शहाण्या मुलीसारखी ताबडतोब घरीं जा पाहूं.

**बेबी** : पण कां म्हणून घरीं जाऊं? मी काय आतां इतकी कुक्कुलं बाळ आहे होय? परवां बाबांनीं असंच मला आंत पाठवलं. म्हणे, 'चहाची व्यवस्था कर.' आतां मी मुळींच जाणार नाहीं. मला ऐकायचं आहे, तुम्ही काय काय बोलतां तें. तूं काल वसंतरावांना भेटलास; पण काय काय बोललास तेंसुद्धां सांगितलं नाहींस.

**श्रीकांत:** वसंताशीं ना? पुष्कळ बोललों.

**बेबी** : खरं? काय बोललास रे?

**श्रीकांत:** वैद्यकीय परिभाषेची चर्चा केली आम्हीं. अशी कीं ॲपेण्डिसायटीसला उंडुपुच्छविद्रधि हेंच नांव योग्य आहे कीं दुसरं कांहीं? आणि आयुर्वेदांत आलं आणि मनुका यांना जें फाजील महत्त्व दिलं गेलं आहे तें योग्य आहे अगर नाहीं, याचाहि आम्हीं विचार केला.

**बेबी** : असं! आणखी एखादा विषय?

**श्रीकांत:** आणखी खगोलशास्त्रावर चर्चा केली आम्हीं. अशी कीं आपापल्या कक्षेंत हिंडणारे ग्रह हे नेहमीं कक्षा सोडून हिंडणाऱ्या मानवावर कांहीं सत्ता चालवितात अगर नाहीं!

**बेबी :** हें सगळं बोलायूकरतां तूं गेला होतास, का त्यांच्या दुसऱ्या लग्नाबद्दल बोलायूकरतां?

**श्रीकांत:** लग्नाबद्दलसुद्धां बोललों आम्ही.

**बेबी :** मग चांगल खडसावून विचारलंस कीं नाहीं आपल्या मित्राला कीं कां तूं हें लग्न करतो आहेस म्हणून?

**श्रीकांत:** तें नाहीं विचारलं.

**बेबी :** अरे पण कां नाहीं विचारलंस?

**श्रीकांत:** कसं विचारणार? पुरुषांना दुसरंच काय पण पहिलं लग्न तरी आपण कां करतों हें कुठं माहीत असतं? मुलं सांगून येतात म्हणून पुरुष लग्न करतात.

**बेबी :** दादा, तूं मला टाळायचा प्रयत्न करतो आहेस, इतकं-सुद्धां मला कळत नाहीं होय?

**श्रीकांत:** खरंच कळतं? मग जा बरं घरीं. इथं काय बोलणं होईल तें मी तुला सविस्तर सांगेन; पण आत्तां तूं इथं असणं मुळींच इष्ट नाहीं.

**बेबी :** पण मलासुद्धां उषाताईंना स्वतंत्र जाब विचारायचा आहे.

**श्रीकांत:** हं? उषाताईंना तूंसुद्धां जाब विचारणार? काय विचार-णार तूं?

**बेबी :** विचारीन, कीं काय म्हणून तुम्ही माझ्या बहिणीच्या सुखाला आग लावतां आहांत?

**श्रीकांत:** आणि तुम्ही त्यांचा प्रेमभंग करून त्यांच्या सुखाला आग लावणार ती ?

**बेबी :** दादा, स्वतःच्या बहिणीपेक्षां तुला ह्या बयेची काळजी जास्त वाटते होय ? मग त्यांचं हें लग्न तरी ठरवून टाक एकदां ! शेवटीं हेंच खरं कीं बायकांच्या भावनांची तुम्हाला किंमतच नाहीं !

**श्रीकांत:** अन् तुला तरी एकट्या तुझ्या अक्काच्याच भावनांची किंमत आहे. तुला वाटतं, अक्काला सवत आली नाहीं कीं सगळ्या स्त्रीजातीचा प्रश्न सुटला.

**बेबी :** असं मुळींच नाहीं. उलट कुठंहि सवतीवर लग्न होऊं नये म्हणून आम्ही झगडतों आहोंत. उरावर सवत म्हणजे बाईचं जिवंत बलिदान !

**श्रीकांत:** आणि सवत येते तेव्हांच फक्त बायकांचं बलिदान होतं अशी तुमची कल्पना ! पण याच्याहिपेक्षां भयंकर बलिदान, कपाळभर कुंकू लावून नवऱ्याबरोबर संसार करणाऱ्या बायकांचं बलिदान, आज कित्येक घरांतून चाललं असेल तें मात्र तुम्हांला दिसत नाहीं ! ह्या बलिदानाविरुद्ध कुठं चळवळ नाहीं सुरू केलीत ती ? संसारांत स्वतःचं मन मारून नवऱ्याच्या पाशवी इच्छेलासुद्धां मान देणाऱ्यांना तुम्ही पतिव्रता म्हणतां ! चेहेऱ्यावरची शांति ढळूं न देणाऱ्या घरांतल्या मृत शांततेच्या रखवालदारणींना तुम्ही भाग्यलक्ष्मी म्हणतां ! ज्यांनीं संसार सोडून घराबाहेर पाऊल टाकून, आपल्या नादान नवऱ्यांची खरी किंमत जगाला जाहीर केली नाहीं, त्या गृहलक्ष्मींचे संसार सुखानं चालले

आहेत असं तुम्ही गृहित धरतां! नवऱ्यानं बायकोवर जन्मांत प्रेम केलं नाहीं, लग्नावांचून काय वाटेल तें केलं तरी चालेल; फक्त त्यांनीं दुसरं लग्न करूं नये एवढी तुमची मागणी! यापेक्षां बलिदान पत्करलं. बळी जाणाऱ्या जनावराला शेवटची किंकाळी तरी फोडतां येते. पण दिखाऊ संसाराच्या होमांत बळी जाणाऱ्या आमच्या बायका स्निग्ध, सोज्वळ, थेंबाथेंबानं जळतात, नाहींशा होतात. पण शेवटचा थेंब संपेपर्यंत होम थांबत नाहीं! बेबी, तुझ्या मूक बलिदानाविरुद्धच्या चळवळीची खरी गरज कुणाला असेल तर ती नुमती परित्यक्तांना नव्हे, असल्या 'भाग्यशाली' गृहलक्ष्मींनाच जास्त आहे.

**बेबी** : पण त्या बायकांची जाहीर मानहानी झालेली नसते. त्यांचे संसार प्रत्यक्ष बुडलेले नसतात.

**श्रीकांत** : संसार, संसार, संसार. मग तो पोकळ, प्रेमहीन असला तरी आम्हांला चालतो; असला म्हणजे झालं! आमच्या सगळ्या जीवनाचं सारंच हें झालं आहे. पोकळ देखावे, तकलुपी इमारती; मग त्यांचा पाया भुसभुशीत असला तरी आम्हांला चालतो. काय असतात ग बेबी तुमच्या संसाराच्या कल्पना? बोहारणीकडून घासाघीस कर करून घेतलेले पितळेचे डबे ओऽऽळीनं फळीवर मांडायचे, संक्रांत आली कीं जांभया देत देत पांढरा शुभ्र हलवा करायचा आणि उष्ण प्रदेशांत रहात असतांना डोकीं फिरल्या-सारखे स्वेटर विणायचे, म्हणजे संसार! असंच ना? अर्ध्या जगाचा संहार झाला, उरलेल्यांतल्या पाऊण जगाला माणुसकीनं जगणं अशक्य झालं; तरी आमच्या बायकांच्या

संसाराच्या कल्पना ओळीनं मांडलेल्या पितळेच्या डब्यांत सांठवल्या आहेत. बेबी, तुझ्यासारख्या नव्या पिढीच्या मुलींनीं तरी आतां त्या संसाराच्या कल्पना बदलायला हव्यात. स्वतःच्या संसाराबरोबर दुसऱ्यांच्याहि ससाराचा सहानुभूतीनं विचार करायला हवा. आपल्या या संसाराच्या घरकुलाचं क्षेत्र थोडतरी विस्तृत करायला शिकलांत तरच तुमच्या या चळवळींना खरा अर्थ येईल.

**बेबी** : हें तुझं तत्त्वज्ञान त्या ऐकतील का ? त्यांना तूं सांगशील का तरी ?

**श्रीकांत**: कां नाहीं सांगणार ? जरूर सांगेन. आपल्यासारखाच प्रेमानं, सहानुभूतीनं दुसऱ्याचा विचार करण्याचं तत्त्वज्ञान जगांत एका स्त्रीला जरी मी पटवूं शकलों तरी पुरे. त्या एका प्रयत्नांत यश आलं तर तुझ्यापेक्षांहि स्त्रियांचं कार्य मींच जास्त केलं असं होईल.

(घंटा वाजते. बाबासाहेब व इंदिराबाई येतात. श्रीकांत आणि बेबी यांच्याकडे आश्चर्यानें पहातात.)

**बाबा** : ऑं, बेबी ! श्रीकांत !

**श्रीकांत**: तुम्ही येणार आहांत असं ऐकलं. म्हटलं आपणहि हजर असावं या कुरुक्षेत्रावर.

**बाबा** : पण, त्या कुठं आहेत ?

**श्रीकांत**: आंत आहेत. येतीलच आतां. बसा ना, काका.

**बाबा** : अस्सं !

**इंदिरा** : बेबी, तूं कां आलीस इथं ?

**बेबी** : मीं म्हटलं, आपणहि कांहीं उषाताईंना सांगून पहावं म्हणून आलें.

**बाबा** : तें करायला आम्हीं आहोंत की अजून ! (श्रीकांताला) हं.मग काय ठरलं, श्रीकांत ? येतं का कांहीं डोकं ताळ्यावर ?

**श्रीकांत**: डोकं ! ताळ्यावर ? आलं असतं; पण, काका, तुम्हीं घोटाळा केलात. तुम्ही आत्तां येणार हें मला सांगायचं तरी ? मला तुम्हांला कितीतरी गोष्टी सांगायच्या होत्या.

**बाबा** : तूं आम्हांला शिकवणार ? आम्ही या वयांत आतां तुझ्या-पासून धडे घेणार ?

**श्रीकांत**: (गर्दानें) म्हणून नव्हे, काका; पण ही मुलगी कोण आहे याची तुम्हांला कल्पना तरी आहे का ?

**बाबा** : म्हणजे कोण हरीजन, मुसलमान, गोरी मडम ? आहे तरी कोण ?

**श्रीकांत**: तशी कुणी असती तरी बरं झालं असतं !

**बाबा** : म्हणजे त्याहिपेक्षां पलिकडची ? ( समोरच्या तंबोरा, तबला वगैरेंकडे अर्थपूर्ण दृष्टीनें पहात ) कोण, आहे तरी कोण ?

**श्रीकांत**: कसं सांगूं तुम्हांला ? काका, ती....

**उषा** : ( आंतून ) श्रीकांत, आली का हो ती मंडळी ?

**श्रीकांत**: ( हतबुद्ध ) हो, आली. या, उषाताई.

( उषा मागें वर्णन केलेल्या आईच्या पोषाखांत येते. तिला पाहून बाबा-साहेब एकदम दचकतात. श्रीकांतहि चकित होतो. इंदिराबाई व बेबी यांना अर्थात् कांहींच कल्पना नाहीं. )

**बाबा** : (एकदम) आँ !

बेबी : ( हळुच आईला ) किती साध्या दिसतात ग? अग, नऊवारी नेसल्या आहेत, अन् चंद्रकोर....

श्रीकांत: ( स्वतःच चकित; पण सांवरून सर्वांची ओळख उषेला करून देत ) उषाताई, हे काका, काकू, बेबी.

बाबा : हो, हो. आणि या उषाताई; नाहीं का? इतका चमत्कारिक भास झाला मला! मला वाटतं, मागं केव्हांतरी मीं यांना पाहिलं असावं——बाकी माणसांसारखीं माणसं पुष्कळ असतात म्हणा.

इंदिरा : ( उषेजवळ जाऊन ) बसा ना. तुम्हांला एकदां भेटावं अशी आमची फार इच्छा होती.

बाबा : ( जरा कुर्‍यांतच ) याच्यापूर्वीच खरं म्हणजे आम्हीं तुम्हांला भेटायला हवं होतं. समजा आज भेटलों म्हणूनहि कांहीं फारसं बिघडत नाहीं. उषाताई, आम्ही आपल्याकडे कां आलों आहोंत याची कल्पना आपल्याला आपल्या चैतन्यदेवांनीं दिलीच असेल. या बाबतींत आपल्याला कांहीं समजावून सांगण्याची पाळी आमच्यावर यावी ही खरोखर आपणां सर्वांनाच नामुष्कीची गोष्ट आहे.

(उषा नुसती रागावून पहाते.)

इंदिरा : ( त्यांना विनवीत ) आपण जरा शांत असावं. उषाताई, आईबापांची माया वेडी असते, तिला धडपड केल्यावांचून रहावत नाहीं म्हणून आलों. आपण त्याचा राग मानूं नका.

बाबा : ( थोडेसे भानावर ) उषाताई, आम्हां दोघांनाहि आपण मुलीसारख्या आहांत. आपल्या सुखाच्या आड कोणत्याहि

तऱ्हेनं यावं असं आम्हांला वाटण्याचं कांहींच कारण नाहीं. पण दुर्दैव हेंच कीं जी गोष्ट आपल्या सुखाला कारण होणार, तीच आमच्या मुलीच्या सुखाचा नाश करणार आहे.

**उषा** : अशाहि घटना जगांत होतात केव्हां केव्हां!

**बेबी** : घटना आपोआप होत नाहींत; केल्या जातात.

**इंदिरा** : बेबी, जरा तूं गप्प बसशील का?

**उषा** : नाहीं; त्या म्हणतात तेंच बरोबर आहे. घटना आपोआप होत नाहींत; घडविल्या जातात.

**बाबा** : आणि इच्छा असली तर त्या टाळल्याहि जातात. आपल्यासारख्या सुशिक्षित स्त्रियांनीं ह्या असल्या घटना टाळायचा प्रयत्न नको का करायला?

**उषा** : असं?

**बाबा** : केव्हांहि. सुशिक्षित स्त्रियांनीं या प्रश्नाकडे फार विचार-पूर्वक पहायला पाहिजे.

**उषा** : आणि सुशिक्षित पुरुषांनीं नको का पहायला?

**बेबी** : असं कसं? या बाबतींत पुरुषसुद्धां दोषी....

**उषा** : होय ना, मग माझ्या ऐवजीं आपल्या जांवयाचीच आपण कां भेट घेत नाहीं?

**बाबा** : पुरुष म्हणजे तसा थोडा बेजबाबदारच असतो. पण बायकांनीं आणि त्यांतल्या त्यांत सुशिक्षित बायकांनीं तर....

**उषा** : पण शिक्षणाचा प्रेमाशीं काय संबंध? मी सुशिक्षित नसतें तरी हेंच—म्हणजे लग्नच केलं असतं.

**बाबा** : हो; पण आपल्या प्रेमाचा एवढा उदो उदो करतांना आपण न्यायाकडे, दुसऱ्याच्या हक्कांकडे, अगदींच दुर्लक्ष करतां आहांत.

**उषा** : ( अगदीं संथपणे ) पुष्कळ लोक जगांत असं करतात. कोण जातं आहे त्यांची चौकशी करायला आणि त्यांना शिक्षा द्यायला ?

**बेबी** : पण दुसरीं माणसं अन्याय करतात, हें कांहीं आपल्या अन्यायाचं समर्थन होऊं शकत नाहीं.

**उषा** : पण मी अन्याय करतें आहें असं मला वाटतच नाहीं.

( श्रीकांत ' उषाताई, काय बोलतां हें तुम्ही ? ' अशा अर्थानें पहातो. )

**बाबा** : तुम्ही अन्याय करतां आहांत, दुसऱ्याचे हक्क हिरावून घेतां आहांत, असं तुम्हांला वाटतच नाहीं ? आश्चर्य आहे !

**उषा** : आश्चर्य वाटतं आपल्याला ? न्यायान्यायाच्या आणि दुसऱ्याच्या हक्कांसंबंधींच्या आपल्या कल्पना अलिकडेच फार कांटेकोर झालेल्या दिसतात ! पंचवीस वर्षांपूर्वी आपल्या कल्पना अशा नव्हत्या. अगदीं वेगळ्या होत्या; नाहीं ?

**बाबा** : उषाताई, तुम्हांला कदाचित् पंचवीस वर्षांपूर्वीच्या माझ्या लग्नाची हकीगत....(गोंधळतात.)

**उषा** : (संथपणें) हो; तुमची एक बायको जिवंत असतांना तुम्हीं केलेल्या दुसऱ्या लग्नाची हकीगत मला माहीत आहे.

**बेबी** : दादा, हें काय बोलताहेत ह्या ? आईचं लग्न असं सवतीवर झालं आहे ?

**श्रीकांत:** तुला घरीं जायला सांगत होतों तें ऐकलं नाहींस. आतां थांब मुकाट्यानं. यापेक्षां कितीतरी जास्त गोष्टी अजून तुला ऐकायच्या आहेत.

**बाबा :** पण मीं जें त्या वेळीं केलं त्याला तशींच कारणं होतीं.

**उषा :** असतील ना. आपल्याला बायको न आवडणं, आपल्या आईची त्याला भर असणं हें तर त्या काळीं फार मोठं कारण असलं पाहिजे.

**बाबा :** केवळ तेंच नाहीं. आईचा एकच मुलगा मी. आईला वंशविस्ताराची इच्छा असणं अगदीं स्वाभाविक होतं आणि तिच्या इच्छेला मान देणं माझं कर्तव्य होतं. लग्न होऊन पुष्कळ दिवस झाले तरी माझ्या पत्नीला मूल झालं नाहीं.

**उषा :** आणि त्या गोष्टीचा फायदा घेऊन आपण आपल्या मनाची हौस पुरवलीत!

**बाबा :** कशावरून? स्वतःच्या सोयीकरतां तुम्ही हे तर्क काढतां आहांत असंहि मी म्हणूं शकेन.

**इंदिरा :** पण या गोष्टीची नसती चर्चा कशाला?

**बाबा :** थांबा जरा. पण मीं मुलाकरतां दुसरं लग्न केलं नाहीं हें कशावरून?

**उषा :** कारण, जन्मांत तिला मूल होणं शक्य नाहीं अशी आपण खात्री करून घेतली नाहींत. तिला पुष्कळ दिवस मूल झालं नाहीं तेव्हां पुढेंहि होणार नाहीं अशी समजूत आपण स्वार्थीपणानं करून घेतलीत; तिच्या स्त्रीत्वाचा अपमान केलात. दुसरं लग्न केलंत.

**बाबा** : त्यांत अपमान कसला? पुष्कळ बायकांना मुलं होत नाहींत.

**उषा** : पण त्या बायकांना त्याबद्दल काय वाटतं याची तुह्माला कधीं कल्पना तरी आली का? तशी केली असतीत तर अपत्य-सुखाकरतां तळमळणाऱ्या तिच्या दुःखी जीवाला तुम्हीं जास्त जिव्हाळ्यानं सोबत केली असतीत. तुमच्या आईला नातवंडाची तहान असेल, त्याहिपेक्षां तुमच्या पत्नीला अपत्याची तहान अधिक असेल; त्या तिच्या दुःखांत सहभागी होण्याऐवजीं तुम्ही तिला एकटीला तळमळत सोडून मोकळे झालांत! याच्या उलट तुमच्यावर कांहीं दैवी आपत्ति आली असती, वेड लागलं असतं तर तिनं जिवाचं रान करून तुमची सेवा केली असती; तुमचे डोळे गेले असते तर ती तुमची काठी झाली असती; तुम्ही भिकारी झालां असतां तर ती तुमच्याबरोबर रस्तोरस्तीं हिंडायला तयार झाली असती.

**इंदिरा** : ( तें ऐकणें असह्य झाल्यामुळें त्यांच्यानें पुढें बोलवत नाहीं. ) उषाताई, पुरे आतां....

**उषा** : पण काय म्हणून पुरे? ह्यांनीं माझ्या आईला नवऱ्याच्या सेवेचंसुद्धां भाग्य लाभूं दिलं नाहीं.

**इंदिरा** : म्हणजे, उषाताई....

**बाबा** : ( एकदम चकित ) माझ्या आईला?

**उषा** : होय, माझ्या आईला. बाबासाहेब, मूल होत नाहीं म्हणून तुम्हीं जिला टाकलीत तिची मी मुलगी!

**बाबा** : तिची मुलगी? तें कसं शक्य आहे?

उषा : आहे; नुसतं शक्य नव्हे, सत्य आहे ! तुम्हीं लग्न केलंत म्हणून दु:खानं वेडी होऊन आई ब्रह्मदेशांत गेली आणि त्यानंतर सहासात महिन्यांनीं माझा जन्म ब्रह्मदेशांत झाला.

बाबा : ( अतिशय गोंधळून ) तरीच मला मघांशीं तसा भास झाला. अगदीं तिला पाहतों आहें असं वाटलं.

इंदिरा : ( एकदम उठून उषाजवळ जाऊन ) उषाताई, तूं त्यांची मुलगी ? ( अगदीं बधिर झाल्यासारख्या उभ्या राहतात. )

उषा : मी त्यांची मुलगी. आणि मी रूपानं आईच्या, तशी गुणानं वडिलांच्या वळणावर गेलें आहें. माझं लग्न माझ्या इच्छेप्रमाणंच झालं पाहिजे. आपण मुलाकरतां लग्न केलंत. मी प्रेमाकरतां करीन; पण करीनच. माझ्या आईच्या सुखाची कदर तुम्हीं केली नाहींत; तुमच्या मुलीच्या सुखाची कदर मीं तरी कां करावी ?

इंदिरा : ( विनवणीच्या स्वरांत ) उषाताई....( डोळे पुसते. )

बेबी : बाबा, कोणत्या तोंडानं तुम्ही आतां त्यांना वसंतरावांशीं लग्न करूं नका असं सांगणार ?

उषा : बाबासाहेब, माझ्या नाहीं, आपल्या लाडक्या कन्येच्या या सवालाला उत्तर द्या. सांगा यापुढं मी तुमच्या न्याय-अन्यायाच्या कल्पनांची चाड कां बाळगावी ? माझी आई, (गहिंवरून) मनानं भोळी, शरीरानं दुबळी असेल; पण ती एक स्त्री होती, तुमच्या अक्काइतकाच तिलाहि संसार करण्याचा, आई होण्याचा हक्क होता. तिच्या संसाराचा हक्क आपण अन्यायानं हिरावून घेतलात; पण परमेश्वरानं

दयेची पाखर घातली. तिचं मातृपद आपण हिरावूं शकलां नाहींत. ( इंदिराबाईकडे वळून ) ज्या न्यायानं आपण माझ्या आईच्या वस्तूचं अपहरण केलंत, तोच न्याय मला लावून पहा. बाबा, माझ्या आईच्या मानसिक यातनांची तुम्हांला कल्पना कधीं आली का? सबंध आयुष्यांत ती कधीं प्रसन्नपणें हंसल्याचंसुद्धां मला आठवत नाहीं. तुमच्या मुलीच्या सुखाकरतां माझ्याकडे येऊन प्रयत्न करण्याची तरी तुम्हांला संधी मिळाली; पण माझे बिचारे आजी-आजोबा! एके दिवशीं त्यांच्यावर अकस्मात् वज्राघात झाला कीं आपल्या जांवयांनीं दुसरं लग्न केलं! माझ्या आईला माहेरीं पाठवून तुम्हीं कपाळाला मुंडावळ बांधलीत! मी लहान होतें. इतर मुलींचे वडील असत. मीं विचारलं, "आजी, माझे वडील कुठं आहेत ग?" आजी संतापून म्हणाली, "तुझे वडील मेले!" मी म्हणालें, "मग आई कुंकू कसं लावते ग?" आईनं रागाच्या भरांत कुंकू पुसलं! बाबा, आज माझ्या दृष्टीला कुंकवाचं महत्त्व नाहीं; पैशाला बचकभर मिळणारी ताबडी भुकटी, सौंदर्यप्रसाधनाच्या साधनांतलं कवडी किंमतीचं साधन तें कुंकू! पण माझ्या आजीच्या दृष्टीला कुंकू म्हणजे भाग्याची निशाणी वाटत होती. बायकांनीं कधीं उभ्यानं कुंकू लावलं तर तेंसुद्धां आजीला खपत नसे. इतकी त्या काळांत कुंकवाची प्रतिष्ठा. तें कुंकू आईनं पुसलं. आजीनं तें पांढरं कपाळ डोळ्यांनीं पाहिलं, त्या दुःखभारानं माझे आजी-आजोबा लवकर म्हातारे झाले; जग सोडून गेले! त्यांच्या दुःखानं आईहि आजारी

पडली; पण शेवटपर्यंत तिला एकच ध्यास की "माझ्या उषाचं लग्न कसं होईल? तिला सुख लागेल का?" ती म्हणायची "बाई ग, लग्न म्हणजे एक जुगार आहे." त्या जुगारांत ती हरली; (इंदिराबाईना) तुम्हीं जिंकलंत!

**इंदिरा** : पुरे, उषाताई, पुरे आतां.

**उषा** : ( त्यांच्याकडे दुर्लक्ष करून बाबांना ) ह्या लग्नाच्या जुगारांत किशोरी अक्का हरल्या; मी जिंकणार आहें. बाबा, आपल्या अविचारी लग्नामुळं माझ्या आईचा एकटीचा नव्हे, आपल्या लाडक्या लेकीचाहि संसार बुडवलात. त्यांच्या दुःखाला कारण मी नाहीं; तुम्ही आहांत! सध्यां त्या माहेरीं तुमच्याकडे आल्या आहेत; नाहीं का? त्या आतां तिथंच राहूं देत. त्यांचा दुरावलेला संसार आतां मी करणार आहें. माझ्या आईवर केलेल्या अन्यायाचा हा सूड आहे.

(एकदम आंत जाते. इंदिराबाई तिच्या पाठोपाठ जाऊन 'उषा' म्हणतात; पण ती तशीच आंत जाते. ती गेल्यावर थोडा वेळ सगळेच हतबुद्ध होतात. थोड्या वेळानें बाबासाहेब रागावल्यामुळें स्वतःला सांवरतात.)

**बाबा** : ( इंदिराबाईना उद्देशून ) कशाला त्या उर्मट पोरीच्या मागं जातां? आणि ही आमची मुलगी; प्रत्यक्ष बापाबरोबर ही भाषा! सगळाच मूर्खपणा. सवतीवरच लग्न करण्याची हौस असेल तर दुसऱ्या कुणाशीं कर म्हणावं. पण प्रत्यक्ष बहिणीच्या नवऱ्याशीं लग्न?

( श्रीकांत नुसता हंसतो. )

आणि तो वसंता तरी शुद्धीवर आहे का?

**बेबी** : पण बाबा, तुम्ही तरी वसंतरावांना असं कसं म्हणूं शकाल?

**बाबा** : अस्सं? आतां तुला वसंताचा कळवळा आला वाटतं! ठीक आहे; आतां तूं त्याच्यावर प्रेम कर! चार दिवसांनीं तो हरामखोर हिलाहि कंटाळला कीं तूं ठोक त्याच्याशीं तिसरं लग्न! तुम्ही सगळे न्यायी आहांत ना?

**बेबी** : तसं नव्हे, बाबा! पण उषाताईंच्यावर जर अन्याय झाला आहे, तर त्यांनीं तरी सूड कां घेऊं नये?

**बाबा** : अरे, कसला सूड हा! आपल्या प्रेमाचे चाळे पुरवायचे आहेत तिला. त्याला आतां सूडाचं आयतं निमित्त मिळालं. मूर्ख कारटी!

**श्रीकांत**: पण तिचं म्हणणं खोटं आहे का?

**बाबा** : बस् झाला आतां हा खऱ्याखोट्याचा निवाडा. आम्हांला आतां या सगळ्याच प्रकाराचा वीट आला. असला हा अपमान सोसण्यापेक्षां अक्काला सवत आलेली पत्करली. काय ह् (इंदिराबाई स्तब्धच पाहून) रे श्रीकांत? आतां आपल्याला इथं क्षणभरसुद्धां थांबायचं नाहीं. तिला म्हणाव, तूं नि तो वसंत, काय वाटेल तो गोंधळ घाला. आमचा तुमच्याशीं काडीचा संबंध नाहीं यापुढं. चल, बेबी.

**बेबी** : पण, बाबा,....

**बाबा** : चल म्हणतों ना. तुला काय भाषण करायचं असेल तें घरीं गेल्यावर कर. सगळे चला.

(बेबी निघते. इंदिराबाई बसलेल्याच असतात. बाबासाहेब दारापर्यंत जाऊन पुनः वळून) चला हो.

**इंदिरा** : (संथपणें) आपण जा.....मला इथं थांबायचं आहे.

**बाबा** : (संतापानें व आश्चर्यानें) झाली इतकी शोभा पुरली नाहीं वाटतं?

**इंदिरा** : शोभा कसली त्यांत? ती तरी आपलीच मुलगी ना! तिच्यासुद्धां सुखदु:खाची काळजी आपणच करायला हवी.

**बाबा** : आतां हद्द झाली तुमच्यापुढं! अहो, तुमच्या मुलीच्या सुखाला आग लागली आणि तुम्ही त्या मुलीच्या सुखाची काळजी करतां?

**इंदिरा** : बोलूं नये म्हणून आतांपर्यंत गप्प बसलें; पण आतां मात्र बोलल्यावांचून रहावत नाहीं. एवढी ब्रह्मदेशाहून सुखरूप आली, जन्मानंतर आपल्याला पहिल्यांदा भेटली, अन् आपण तिच्याशीं असे वागलांत!

**बाबा** : आतां तुमचीं डोकीं तपासायला हवींत. मान, अपमान सगळं गुंडाळलं आहांत तुम्हीं. आम्हांला हें साफ पसंत नाहीं आणि आम्ही आतां इथं एक क्षणभरसुद्धां थांबणार नाहीं. चल, बेबी. चला हो तुम्ही.

( एवढ्या वेळांत श्रीकांत इंदिराबाईशीं कांहीं तरी हळु आवाजांत बोलत असतो. त्याला उद्देशून )

**इंदिरा** : श्रीकांत, मग बोलूं आपण. हे इथं आपलीसुद्धां शोभा करायला कमी करणार नाहींत.

**बाबा** : ए, तुम्हांला काय खलबतं करायचीं असतील, कुजबुजायचं असेल, तें घरीं; इथं नको. व्हा म्हणतों ना पुढं? बेबी, काय म्हणतोंय मी? ( इंदिराबाई व श्रीकांत बाहेर पडतात. )

**बेबी** : पण, बाबा, विवाहाच्या या जागतिक प्रश्नावर.........

**बाबा** : तुला काय भाषणं करायचीं असतील, लेक्चरं झोडायचीं असतील, तीं घरीं. इथं आतां एक शब्द नाहीं ऐकून घेणार. हो पुढं.

( दोघें जातात. **पडदा.** )

# जुगार

## अंक चौथा

( स्थळः—उषेचें घर. पडद्यापलिकडच्या पलंगावर उषा झोंपलेली आहे. सकाळीं आठ वाजून गेलेले आहेत. उषा उठण्याची चैतन्य वाट पाहतो आहे. )

**चैतन्य** : उषा, बेटी, आतां उठावा. फार उशीर झाले.

( उषा जागी होत नाहीं. अखेर चैतन्य तंबोरा काढून त्याच्या तारा जुळवूं लागतो. तों एक तार तुटते. तो आवाज ऐकून उषा एकदम किंचाळून उठते. बाहेर येऊन वांकून वांकून आरशांत पाहते. पाठीवरची वेणी खांद्यावरून पुढें घेऊन पुनः पाहते. तिच्या ह्या हालचालीकडे चैतन्य लक्षपूर्वक पहातो आहे. पण तिला त्याची कल्पना नाहीं. अखेर चैतन्य तिला हांक मारतो. )

**चैतन्य** : उषा, बेटा ....

**उषा** : ( वळून ) बाबा ? तुम्ही केव्हां आलांत ?

**चैतन्य** : आम्हाला वेळ झाले पण तूं असा ओरडला कां ? इतका घाबरले ? आरसा कां पाहिले, बेटी ?

**उषा** : बाबा, स्वप्नांत मला माझे केस पिकलेले दिसले ! हो, अगदीं पांढरे शुभ्र. ( पुनः घाबरून वेणी पहाते. )

**चैतन्य** : स्वप्नमध्यें तर कांहीं पण दिसते. आम्हीं तर स्वप्नमध्यें हवेंत उडते, हत्तीवर बसून उडते. स्वप्न तो असाच असतो, बेटी.

उषा : पण, बाबा, नुसते केस पिकल्याचं नाहीं—सारी रात्र मला किती चमत्कारिक स्वप्नं पडत होतीं !

चैतन्य : असा ?

उषा : कशाचा कशालाच मेळ नाहीं ! एका लांब रस्त्यानं मी चाललें होतें. दोन्ही बाजूंच्या झाडांचा पिवळा पाचोळा पडून नुसता ढीग झाला होता आणि त्या पाचोळ्या-वरून मी चाललें होतें. चालतां चालतां मी थकलें. मग हातांत एक काठी घेऊन चाललें.

चैतन्य : अरे ! आपल्या त्या कठीण प्रवासाचा चित्र तूं स्वप्नांत पहातो——

उषा : तसंच असेल. रात्रभर स्वप्न ! कशाचा कशाला मेळ नाहीं. कुठंतरी माझे वडील दिसले. नात्याचीं माणसं दिसलीं.

चैतन्य : अरे, पण तूं तो आपला वडीलला पाहिला पण नाहीं; तो तुला स्वप्नमधीं कसा दिसतो ?

उषा : खरंच. माझे वडील मीं पूर्वीं कधीं पाहिले होते ?

चैतन्य : वडीलला पहातो तो तूं ओरडतो कशाला, उषा ?

उषा : नाहीं, बाबा, शेवटीं मला वसंत दिसला.

चैतन्य : तो तूं ओरडला ! ( हंसतो. )

उषा : तसं नव्हे, बाबा; अगदीं आत्तां आत्तां मला स्वप्न पडत होतं कीं खूप मोठी बाग आहे. तिच्यांत झोपाळा आहे. वसंतानं मला त्या झोपाळ्यावर बसवलं. मी झोके घेत होतें पण इतक्यांत कुठून तरी एक श्रीकांतासारखा माणूस आला, त्यानं मला खूप झोके दिले. मी घाबरलें,

नको नको म्हणून ओरडलें. पण तरी त्यानं झोके दिले, जोरानं दिले आणि बाबा....(एकदम घाबरून डोळे मिटते.)

चैतन्य : अरे, पण तूं स्वप्नला इतका कां भिते ?

उषा : पण, बाबा, त्या झोपाळ्याच्या सांखळ्या खळकन् तुटल्या आणि—

चैतन्य : आणि तूं ओरडला; होय ना ? अरे, ते सांखळी नाहीं ! माझ्या तंबोऱ्याची तार तुटले ! पण, उषा, तूं आतां स्वप्न विसरतो तो फार चांगला होतो. बेटा, मला कालचा सर्व गोष्ट सांग. वसंताचे सासरा काय म्हटला ? तूं काय म्हटला ?

उषा : काय म्हणणार मी ? वसंताशीं लग्न करणार नाहीं असं वचन देऊं मी त्यांना !

चैतन्य : No. No. No. तूं तो वसंताशींच लग्न कर. मी त्याला पण सांगितला, तुमचा दोघांचा इतका प्रेम, तुम्ही लग्न करतो तोच ठीक. तो आका पण आम्हीं मुलगी म्हणतो. तूं वसंताच्या सासऱ्याला सांगून पाठवतो.

( घंटा वाजते )

उषा : ( दचकून ) वसंत असेल. बाबा, माझं अजून तोंडधुणंसुद्धां व्हायचं आहे.

चैतन्य : तूं जा, बेटी. मी दरवाजा उघडतो.

( उषा आंत जाते. चैतन्य विंगमध्यें जातो. इंदिराबाईसह परत येतो. इंदिराबाईंची मुद्रा अत्यंत शांत आणि निश्चयी )

इंदिरा : ( आल्याबरोबर ) ताई आहेत कां घरांत ?

**चैतन्य :** आपण बसतो. ताई आत्तां येतो.

( चैतन्य तंबोरा उचलून ठेवतो. खुर्ची पुढें करतो. कोणी परकी बाई आली, असं समजून आंत जातो. उषा तोंड धुऊन रुमालानें तोंड पुशीत बाहेर येते. )

**उषा :** ( आल्याबरोबर ) येऊं नको म्हटलं तरी आलास ना, वसंत!

( डोळ्यावरचा रुमाल काढते, तों इंदिराबाई दिसतात. )

**उषा :** ( त्यांना पाहून ) कोण, इंदिराबाई, तुम्ही ? अन् माझ्याकडे आलांत ?

**इंदिरा :** होय. तुझ्याकडे आलें. कां ? तुला आश्चर्य वाटलं; होय ना?

**उषा :** ( गोंधळून ) नाहीं, तसं नाहीं.

**इंदिरा :** तुला.......नसेल वाटलं. पण माझं मलाच आश्चर्य वाटत आहे........उषा, परवांच्या त्या प्रसंगानंतर मी तुझ्याकडे येऊं शकलें........कुठल्यातरी अज्ञात शक्तीनं जणु काय खेंचून माझी पावलं तुझ्या घराकडे वळविलीं........ माझंच मला आश्चर्य वाटत आहे.

**उषा :** ( कडवटपणानें ) माझं मन वळविण्याचा पुन्हां एकदां प्रयत्न करून पहावा, असं तुम्हांला वाटलं असेल.

**इंदिरा :** छे छे. नाहीं. तुझं मन वळविण्याचा प्रयत्न करण्याइतकी पुण्याई तरी माझ्याजवळ कुठं आहे ? जिच्या आईच्या संसारावर माझ्या हातानं निखारे ठेवले गेले, तिच्याजवळ माझ्या मुलीचा संसार वांचव असं मी कोणत्या तोंडानं म्हणूं ?

**उषा :** खरंच आहे. आणि माझा तो परवांचा निश्चय........

**इंदिरा :** तो निश्चय तूं केलास ? मला खरं नाहीं वाटत. तो निश्चय करणारी उषा ती तूं नव्हतीसच.

उषा : मी नव्हतें....मी नव्हतें ?

इंदिरा : अं हं. परवांचा तुझा त्वेष, तुझे विचार, अंतःकरण पिळवटून बाहेर पडलेलं तुझं दुःख--इतक्या कोवळया वयांत असल्या दुःखाचे चटके तुला कुठून बसलेले असणार ?

उषा : कुठून म्हणजे ?

इंदिरा : उषा, तें दुःख तुझं नव्हतंच. तुझ्या आईनं मरेपर्यंत सोसलेल्या साऱ्या मानसिक यातनांना परवां तुझ्याकडून वाचा फुटली. .... दुःखाचे वडवानल तिनं समुद्रासारखे पोटांत कसे वागवले असतील ? अपमानाचें जहर बिनतक्रार आपल्या ओठाला कसं लावलं असेल ? संतापाच्या, निराशेच्या, भाराखालीं त्यांचं जीवन किती गुदमरलेलं असेल ! ....त्याचं चित्र परवां तूं शब्दांनीं रंगवलंस .... म्हणूनच मला वाटलं कीं, परवांची तूं .... ती खरी उषा नव्हतीसच. .... शरीर तुझं; पण तुझ्या मनाला बाजूला सारून परवां त्यांत तुझ्या आईनं प्रवेश केला होता ! वसंतरावाशीं लग्न करण्याचा निर्धार तूं केलास ? .... मीं तुझे शब्द ऐकलेच नाहींत.

उषा : नाहींत ? तुम्हीं माझे शब्द ऐकले नाहींत ?

इंदिरा : नाहीं. मीं काय ऐकलं ? काय पाहिलं ? त्याचं वर्णन तुला कसं सांगूं ? ........ तुझ्या डोळयांतून तुझी आई माझ्याकडे तिरस्कारानं पहात होती....ती मला म्हणाली .... तूं माझा संसार बुडवलास ! आतां माझी मुलगी, माझ्या रक्तामांसांनीं मीं जिचं पोषण केलं .... ती माझी मुलगी, तुझ्या नव्हे--तुझ्या मुलीच्या संसाराला आग

लावील.' ( शहारे येऊन ) उषा, तुझा निर्धार हा 'तुझा' नाहीं.–तुझ्याकडून तुझ्या आईनं करविलेला तो निर्धार !

उषा : ( एकदम तोंड झांकून ) इतकी दुष्ट नव्हती माझी आई.

इंदिरा : आणि तूंहि नाहींस. पण हा निसर्गाचा न्याय आहे. दुसऱ्याचा बळी घेणाराला एक वेळ स्वतःच बळी जाण्याची वेळ येणं हें स्वाभाविकच नाहीं का ?

उषा : होय ना ? माझ्या आईच्या सुखाचा बळी तुम्हीं घेतलात नां?

इंदिरा : मीं तुझ्या आईच्या सुखाचा बळी घेतला ?—मीं घेतला ? ( शून्याकडे पहात )... ....होय. जगानं त्या वेळेस हेंच म्हटलं....... अजूनहि म्हणतं. वेडं असतं जग. दृश्या-पलिकडं असलेला अर्थ त्याला कुठं कळतो ? जगानं म्हटलं तेंच सत्य, अशी मींहि पण मनाची समजूत करून घेतली होती........जगाची गोष्टच वेगळी; पण तूं, प्रत्यक्ष आमची मुलगी, तुलाहि तसंच वाटलेलं पाहिलं. त्या कल्पनेनं तुला झालेल्या यातना पाहिल्या. मला स्वस्थ बसणं अशक्य झालं. पंचवीस वर्षं दडपून ठेवलेलं माझं मन....परवांपासून त्यानं माझी सत्ता झुगारलेली आहे. तें म्हणत आहे, 'तूं कुणाचाहि संसार उध्वस्त केला नाहींस. या प्रकारांत तुझा काडीचाहि अपराध नाहीं.'

उषा : म्हणजे काय ? माझ्या आईचा संसार तुम्हीं उध्वस्त केला नाहींत ?

इंदिरा : नाहीं. मुळींच नाहीं. तुझ्या आईचा संसार तर मीं उध्वस्त केलाच नाहीं; पण उलट, त्यांनीं मांडलेल्या संसाराच्या

पटावर माझ्या सुखाचं मोहरं मारलं गेलं. बलिदान माझं झालं! आणि त्या पटावरच्या कोंडींत मी आज पंचवीस वर्षं गुदमरतें आहें! माझ्या सख्ख्या आईनं प्रेमानं मला या कोंडींत कोंडली! त्या बिचारीला माझ्या पुढच्या आयुष्याची कल्पनाहि आली नसेल. तिला वाटलं, नवरा तरुण आहे, हौशी आहे, पैसेवाला आहे, पहिली बायको आवडत नाहीं, तेव्हां आपल्या मुलीला सुख लागायला काय हरकत आहे?

उषा : आणि तसं तें लागलं ना?

इंदिरा : सगळ्यांनाच वाटलं; तुला वाटलं तर काय नवल? आणि दुरून पहाणाराला माझा संसार सुखाचा होताहि. हौस होती, पैसा होता. सोन्यासारख्या दोन मुली होत्या. तुझ्या वडिलांनीं त्यांच्या परीनीं मला सुखीच करण्याचा प्रयत्न केला. पण........

उषा : कां? पण कसला?

इंदिरा : कां कोण जाणे, पण जीवनाचा आनंद मनमुराद असा मीं कधीं लुटलाच नाहीं. आंतून मनाची टोंचणी, बाहेरून समाजाची टोंचणी. त्या दोन टोंचण्यांनीं माझं जीवन असह्य केलं. नवी नवरी म्हणून मी घरांत आलें. सासूबाई माझं कोडकौतुक खूप करीत. पण जें तें विचारी 'ह्याच का दुसऱ्या सूनबाई?' त्या कुत्सितपणाच्या धारेनं मला काळीज कापल्यासारखं वाटे. आमच्या घरांत त्यांच्या पहिल्या लग्नाचा उल्लेख चुकूनसुद्धां होत नसे; झाला नाहीं. पण तें सत्य डोळ्याआड

करण्याचा प्रयत्न जों जों तुझे वडील जास्त करीत, तों तों तें सत्य माझा अधिकच पाठपुरावा करी ! माझ्या चोवीस तासांच्या जीवनावर तुझ्या आईची छाया होती. माझ्या संसारांतील प्रत्येक वस्तू त्यांनीं हाताळलेली होती. त्यांचे दागिने मी अंगावर वागवीत होतें. गोठ-पाटल्यांचा वीड लहान कां ?.... त्या अशक्त होत्या. नथ मोठी कां ? त्यांना शोभत असे. लग्न झाल्यावर पहिल्या पहिल्यांदा तर माझ्या भोंवतालच्या सगळ्या वातावरणांत तुझ्या आईच्या अस्तित्वाच्या साक्षी मला दिसत ! संस्काराची ओटी आधीं मेलेल्या सवतीच्या नांवानं भरतात, तेवढ्यानं तिच्या ऋणांतून मुक्त होतां येतं. पण हें जिवंत सवतीचं अस्तित्व ! त्याला कधींच शेवट नाहीं. उषा, तूं परवां म्हणालीस कीं तुझ्या आईनं गुदमरलेलं जीवन काढलं..... पण त्यांचं जीवन खरं गुदमरलेलं नव्हतं. ज्या घरांत त्यांच्यावर अन्याय झाला, त्या घरांत त्यांनीं पुन्हां पाऊल-सुद्धां न ठेवतां ब्रह्मदेशाचा रस्ता धरला. खरं गुदमरलेलं जीवन मीं काढलं. अजून काढतें आहें आणि आतां तर अक्का माझ्या घरीं राहिल्यावर त्याची सोबत मला शेवट-पर्यंत पुरणार आहे. आमचा श्रीकांतसुद्धां म्हणतो कीं, 'लग्न हा एक जुगार आहे.' अगदीं खरं वाटतं मला. कधीं सुखाला कारण होतं; कधीं होत नाहीं. पण माझ्या लग्नाचा जुगार खेळण्याला जबाबदारसुद्धां मी नव्हतें. माझ्या हातांत फांसे दिले गेले; भीतीनं ते हातांतून गळून पडले, तेंच दान ठरलं ! मी सुखी झालें असं सगळ्यांनीं ठरवलं; मीं तें कबूल केलं. पतिव्रताधर्माच्या पालनाकरतां

कबूल केलं. तरी माझा प्रीतिविवाह नव्हता. फांसे मीं धरले नव्हते.

उषा : पण मी ते फांसे जाणून बुजून धरणार आहें.

इंदिरा : जरूर धर. ते धरूं नको असं मी कसं म्हणूं ? पण, उषा, परमेश्वराचं नांव घेऊन मी तुला सांगतें—अक्काची आई म्हणून नव्हे—पुरुषमनाचा अनुभव घेतलेली केवळ एक स्त्री म्हणून सांगतें कीं विचार करून डाव टाक. फांसा हुकमी पडला तर ठीक. नाहीं पडला तर प्रेमाच्या भांडवलाचं दिवाळं तर वाजेलच; पण भरीला समाजाच्या सहानुभूतीचं कर्जहि मिळणार नाहीं !

उषा : कां पण समाजाची एवढी प्रतिष्ठा ? आपलं जीवन आपण सुखी केलं पाहिजे.

इंदिरा : ( हंसून ) आपण म्हणजे कुणी, नवराबायकोंनीं ? उषा, तूं खरंच लहान आहेस. माझ्यापेक्षां एका पिढीनं लहान आहेस. पण केवळ प्रीतिविवाहामुळं बाई सुखी होऊं शकते ही कल्पनाच मला हास्यास्पद वाटते. पुरुषांचा अवखळ स्वभाव, त्याला बंधनांत ठेवण्याकरतां बायकांचा चाललेला अखंड अट्टाहास, ह्या सगळ्यांतून निर्माण झालेलं लग्न हें एक विचित्र कोडं आहे. प्रीतिविवाहानं सुटण्याइतकं तें सोपं खास नाहीं; आणि त्यामुळं त्याचं जुगारी स्वरूपहि बदलत नाहीं. हें कोडं सोडवायला हवं असेल तर आम्हीं बायकांनीं त्याच्याकडे विचारपूर्वक पहायला हवं. नुसतं सुखाचं साधन म्हणून आशाळभूतपणें पहातांच कामा नये.

उषा : हो; पण मला जर त्यांत सुख वाटत........

इंदिरा : नाहीं. उषा, खरं सांगूं ? स्त्रीजातीला खऱ्या सुखाचा लाभ एकाच कल्पनेंत आहे—आईपणाच्या. उषा, मला माझं आयुष्य आठवतं. लग्नामुळं मी सुखी झालें कीं नाहीं, कोण जाणे; पण अक्काचं पहिलं 'टयाहां' ऐकलं, कसल्या-तरी अनिर्वचनीय आनंदानं माझ्या शरीराचा कण न् कण फुलून निघाला ! अक्का आणि बेबी या दोघींच्या जिवावर मीं जगांतलीं सगळीं दु:खं विसरलें. (आठवतात;) बेबीच्या पाठीवरचा माझा बाळ........तो आजारी होता. एक दिवस मला स्वप्न पडलं. मी देवघरांत नंदादीप लावला. कुठून तरी वाऱ्याची झुळूक आली; तो मालवला. माझ्या पोटांत धस्स झालं ! मीं जणुं काय हवेंत विरलेले शब्द ऐकले, "ह्या घरांत नंदादीप लावायचा तुला अधिकार नाहीं." माझा बाळ........( एकदम तोंड झांकून हुंदका देतात) खरंच मला तो अधिकार नव्हता. कारण माझ्या संसाराच्या इमारतीचा पाया भरतांना एक जीव बळी दिला होता. तो जीव एका गर्भवतीचा होता हें मला परवां कळलं. आणि त्या भयंकर स्वप्नाचा उलगडा झाला ! मी कुणालाच दोष देत नाहीं; पण माझी अक्का... गेल्या पंधरा दिवसांत आम्ही एकमेकींच्या दृष्टीला दृष्टि भिडवायलासुद्धां घाबरतों आहों. कोणत्या तोंडानं मी तिला सांगूं कीं उषा तुला अन्याय करते आहे म्हणून ? ज्या मुलीच्या नुसत्या अस्तित्वानं मला जीवनाचं सार्थक झाल्यासारखं वाटलं, तिच्या नशिबाचे धिंडवडे मी आतां डोळ्यांनीं पहातें आहें. आणि तरी मी कांहीं करूं शकत नाहीं. मुलांना जन्म देणें सोपं आहे पण भोंवतालीं पसरलेल्या

विचित्र कोलाहलांतून त्यांना वांचवणं, सुखी करणं हें आम्हो करूं शकत नाहीं. कसं आमच्या मुलांना सुख लागेल ? मला आठवतं, तुझी आई वारल्याचं कळलं, कबूल करायला लाज वाटते पण—मला अगदीं हायसं वाटलं; एक निरपराध जीव, जगांतल्या अन्यायाला कंटाळून, विटून, जग सोडून गेला. आम्ही दोघं सुखी झालों! उद्यां तुझं लग्न झालं, तुम्हांला सुखी व्हायचं झालं तर तुमचं अगदीं आंतलं मन कशाची वाट पाहील? माझ्या अक्काच्या मृत्यूची! परिस्थितीच्या दडपणामुळें कां होईना, पण एका मनुष्यानं आपल्या सुखाकरतां दुसऱ्याच्या मृत्यूची वाट पहायची! मनुष्याच्या अधःपाताची परिसीमा इथपर्यंत जाऊं शकते! उषा, मी तुला दोष देत नाहीं. वसंतरावांच्या मनांत तुझ्याशीं लग्न करण्याचा विचार आला, त्याच दिवशीं अक्काच्या संसाराला तडा गेला. तुला सांगितल्यानं तो संसार आतां सांधला जाईल असं मला वाटलंहि नाहीं; तरी मी तुझ्याकडे आलें. अक्काच्या संसाराची भीक मागण्याकरतां, नव्हे; माझं गुदमरलेलं मन मोकळं करण्याकरतां, तुझ्या मनांतली माझ्याबद्दलची अढी दूर करण्याकरतां. अक्काला सुख लागलं तर तें मला हवंच आहे; पण ती गोष्ट आतां कुणाच्याच हातची नाहीं; पण लहानपणापासून पारखं झालेलं मायेचं सुख तुला देणं मात्र मला शक्य आहे. तें देण्याकरतां, तुला मायेची तीट लावण्याकरतां आलें.

(इतक्यांत एकदम वसंत येतो. त्याचें इंदिराबाईकडे लक्ष जात नाहीं.)

**वसंत** : उषा, आपल्या विवाहाची अगदीं तयारी झाली आहे, खालीं गाडीसुद्धां आणली.

( इंदिराबाईंना लक्षपूर्वक पहातांच एकदम चपापतो. )

**इंदिरा** : ( त्याची अजिबात दखल न घेतां, ) उषा, जातें मी.

**उषा** : थांब, आई. जाऊं नको. माझं मन आज गोंधळलं आहे, भांबावलं आहे.

**इंदिरा** : उषा, भांबावूं नको. तुला योग्य वाटेल तशी वाग. तुला तुझं माहेरघर सतत उघडं राहील.

**उषा** : आई, जरा आंत थांब. मला अजून तुझ्याशीं पुष्कळ बोलायचं आहे.

( उषाला हुंदके आवरत नाहींत. )

**इंदिरा** : आंत जाऊं? तुझी मर्जी!

( आंत जाते. )

**वसंत** : उषा, काय हें! तूं रडते आहेस?

**उषा** : ( स्वतःचें मन आवरण्याचा पराकाष्ठेचा प्रयत्न करीत ) हो, हा प्रसंगच तसा आहे.

**वसंत** : ( इंदिराबाईंना उद्देशून ) पण उषा, या सर्व लढाईचा विचार आपण आधींच नव्हता का केला?

**उषा** : पण लढाईच्या अगोदर केलेले किती तरी बेत लढाई सुरू झाल्यावर बदलावे लागतात.

**वसंत** : ही भाषा मला समजत नाहीं आणि ती समजावून घेण्याची माझी इच्छा नाहीं. तूं मला लग्नाचं अभिवचन

दिलं आहेम. आपलं प्रेम म्हणजे काय वाऱ्याच्या झुळुकी-बरोबर येणारा क्षणैक विचार आहे ? कीं कुणीं त्यावर फुंकर घातल्याबरोबर तें भुर्रदिशी उडून जावं ?

**उषा** : वसंत, मीं तुझ्यावर प्रेम केलं, अथांग प्रेम केलं—खरं आहे. पण निदान आज तरी माझ्या मनाचा इतका गोंधळ उडाला आहे कीं........क्षमा कर, वसंत, आज तरी तूं मला लग्नाचा आग्रह करूं नको.

**वसंत** : नाहीं, उषा, खालीं गाडी उभी आहे. एक क्षणाचाहि विलंब न लावतां तुला आतां खालीं उतरलंच पाहिजे.

**उषा** : ( निश्चयी स्वरांत ) तें मी करूं शकत नाहीं.

**वसंत** : करूं शकत नाहीं ? वेड तर नाहींना लागलं तुला, उषा ?

**उषा** : तसंहि म्हण पाहिजे तर.

**वसंत** : उषा, तुझं मन दुबळं झालं आहे. इतके दिवस मी दुबळा होतों अन् तूं समर्थ होतीस. तुझ्या खंबीर मनाच्या पाठिंब्यामुळं मी आजवर माझा निश्चय डळमळूं दिला नाहीं; पण आज परिस्थिति उलटी झाली आहे. माझं मन दांडगं झालं आहे.

**उषा** : आणि माझं मन भांबावलं आहे, दुबळं झालं आहे !

**वसंत** : असं वेड्यासारखं काय करतेस, उषा ? या थरावर गोष्टी आल्यावर अशा तऱ्हेनं आपण लग्न लांबणीवर टाकूं लागलों तर माझी काय दुर्दशा उडेल याची तुला कल्पना तरी आहे का ? किशोरीचा संसार उध्वस्त करणारा नराधम अशी माझी नाचक्की गांवभर झालीच आहे.

त्याच्या भरीला एका कुमारीचा विश्वासघात करणारा नरराक्षस अशीहि कीर्ति माझ्या वांट्याला यावी, असं का तुला वाटतं ? नाहीं. मी ती येऊं देणार नाहीं. शिवाय चैतन्यबाबांनींहि मला काल बजावलं आहे कीं तावडतोब लग्न कर; नाहीं तर तुझी भेट घ्यायची मी उषाला बंदी करीन.

उषा : तरीसुद्धां मला आज लग्न करणं शक्य नाहीं. वसंत, तूं माझ्यावर खरं प्रेम केलं असशील, तर तुला त्याच प्रेमाची शपथ आहे. खरंच तूं मला आज तरी लग्नाचा आग्रह करूं नको. मला थोडी सवड दे.

वसंत : ( तिच्या विनंतीनें अगदीं विरघळून ) किती वेळ ? आजचा दिवस ?

उषा : चालेल; पण मला एकटीला वेळ दे.

वसंत : उषा, तुझी मनःस्थिति पहावत नाहीं, म्हणूनच मी कसाबसा एक दिवस काढणार; पण उद्यां मात्र हें लग्न झाल्यावांचून रहात नाहीं. जातों मी.

( जाऊं लागतो. )

उषा : ( एकदम त्याच्या मागें धांवत जाऊन ) वसंत.....

वसंत : ( मागें वळून ) काय म्हणतेस ?

उषा : कांहीं नाहीं. जा तूं. ( वसंत जातो. उषा, निश्चल दृष्टीनें त्या दिशेकडे थोडा वेळ पहाते. शेवटीं म्हणते ) प्रेमी जीव ! वसंत, तुझी आजची निराशा मीं उद्यांवर ढकलली; पण माझें जन्माचं सुख.... ( एकदम कोसळून हुंदके देत जमिनीवर बसते.

खुर्चीवर डोकें टेकून हुंदके देते. ते हुंदके ऐकून आंतून इंदिराबाई येतात. तिच्या खांद्यावर हात ठेवून तिला हळूच )

इंदिरा : हें काय, उषा? अन् वसंतराव कुठं आहेत?

उषा : वसंत कुठं आहे? परत गेला. मीं त्याला परत जा म्हटलं!

इंदिरा : म्हणजे? तूं वसंतरावांना परत पाठवलंस?

उषा : होय. दुसऱ्याच्या दुःखाश्रूंतून स्वतःची सुखनिर्मिति होऊंच शकत नाहीं. माझं सुख....माझं सूख....नको मला तें सुख.

इंदिरा : ( तिच्या निश्चयाची कल्पना येऊन ) म्हणजे काय, उषा? आपल्या सुखसर्वस्वाचा त्याग करायचं ठरवलंस?

( उषा मानेनेंच 'होय' म्हणते. इंदिराबाईच्या तोंडून शब्द फुटणें कठीण होतें. अखेर त्या एकदम म्हणतात ).

इंदिरा : किती थोर आहेस तूं, उषा!

उषा : मी? कीं अधःपातापासून मला वांचविणारी माझी आई—तूं?

( एकदम इंदिराबाईच्या गळ्यांत पडते. )

( पडदा )